आर्याबद्ध-

# श्रीमद्भगवद्गीता.

लेखक

'महाराष्ट्रभाषाचिन्मयूर'

**कृष्णाजी नारायण आठल्ये.**

एडिटर केरळकोकिळ.

प्रकाशक

'केरळकोकिळग्रंथप्रसारक' मंडळी.

'माधवाश्रम' गिरगांव.

मुंबई.

सन १९०८.

किंमत १४ आणे.

ट. व्ही. पी. सह १ रुपया.

# आर्याबद्ध-
# श्रीमद्भगवद्गीता.

हा ग्रंथ,

**कृष्णाजी नारायण आठल्ये,**

फोटोग्राफर, आर्टिस्ट आणि एडिटर केरळकोकिळ, सार्थ व सटीप ज्ञानेश्वरी व दासबोध, राजयोग, कर्मयोग, भक्तियोग, गीता-पद्यमुक्ताहार, सासरची पाठवणी इ० ग्रंथांचे कर्ते,

ह्यांनीं तयार केला,

**तो**

**मुंबई येथें,**

**जावजी दादाजी, यांच्या**

**'निर्णयसागर'** छापखान्यांत, **'केरळकोकिळ'ग्रंथप्रसारकमंडळी**

ह्यांनीं छापून प्रसिद्ध केला.

आवृत्ति पहिली-२००० प्रति.

सन १९०८.

---

**किंमत १४ आणे.**

ट. व्ही. पी. सह १ रुपया.

# प्रस्तावना.

श्लोक.

कथाश्रवणचत्वरीं जरि पुनःपुन्हा ये, रते- ।
महा रसिक तद्रसीं, विटति ऐकतां येर ते ॥

केकावलि.

ही वरील मोरोपंतांची भगवत्कथेसंबंधाची उक्ति, श्रीमद्भगवद्गीतेसही लागू पडते. ह्या लहानशा ग्रंथाचा रसिकानें एक वेळ आस्वाद घेतला पुरे, कीं तो तिच्यावर मधुमक्षिकेप्रमाणें लुब्ध होऊन पडतो. गीता हा ग्रंथच असा आहे कीं, त्याच्या अर्थामध्यें एक वेळ प्रवेश झाला कीं, त्याचीं पारायणें व मनन कितीही केलें तरी पुरेसेंच होत नाहीं. ह्मणून ह्या लहानशाच सर्व वेदांच्या साररूप ग्रंथावर लहान मोठ्या शेंकडों टीका झाल्या आहेत. श्रीमच्छंकराचार्य, ज्ञानेश्वर महाराज, तुकाराम महाराज, एकनाथ, मोरोपंत, वामनपंडित, तुळशीदास, मुक्तेश्वर वगैरे अनेक ग्रंथकारांनीं व सत्पुरुषांनीं आपआपल्या परी अनेक टीका आजपर्यंत केलेल्या आहेत, व पुढेंही तशाच नवीन नवीन लोक करित आहेत. ह्यावरूनच ह्या भगवदुक्तीच्या ७०० श्लोकांमध्यें केवढी जादू भरली आहे, ही गोष्ट लक्षांत येईल. त्यांत सुद्धां एकएकानें एकच टीका केली आहे असें नाहीं, तर एकीनें आपल्या मनाचें नीट समाधान झालें नाहीं, किंवा लोकांच्या मनाचें समाधान नाहीं, ह्मणून एकानेंच अनेक टीकाही केल्या आहेत. उदाहरणार्थ—वामनपंडितांनीं समश्लोकीची एक उत्तम टीका केलेली असूनही त्यांच्या मनाचें समाधान होईना ह्मणून 'यथार्थदीपिका' ह्मणून दुसरा प्रचंड ग्रंथच केला. पण त्यानें तरी त्यांच्या मनाचें पूर्ण समाधान झालें किंवा नाहीं हा वानवाच दिसतो. तशीच थोडीशी

गोष्ट आमच्या मनाची झाली. प्रथम आह्मीं गीतार्थाचें अवलोकन केल्यानंतर त्यावर नाना वृत्तबद्ध श्लोक करावेत ह्मणजे प्राकृत जनांस फार उपयोगीं पडतील असें वाटलें, ह्मणून इ० स० १८८४ मध्यें **'गीतापद्यमुक्ताहार'** नांवाचा मराठी वृत्तबद्ध श्लोकांचा ग्रंथ केला, व त्याची दुसरी आवृत्ति **'निर्णयसागर'**च्या मालकांनीं गेल्या वर्षीं पुन्हा सुधारल्याप्रमाणें छापून प्रसिद्ध केलीच आहे. ती प्रसिद्ध झाल्यानंतर एके दिवशीं सहजीं मनांत कल्पना आली कीं, गीतेच्या श्लोकाचा, अर्थ श्लोकापेक्षां आर्येंत अधिक सुलभ रीतीनें गोंवतां येईल. व तो समजण्यास त्याहूनही अधिक सोपा जाईल. ह्मणून सहज १।२ अध्यायांच्या आर्या केल्या. त्या बऱ्याच सुबोध झाल्या असें वाटलें. ह्मणून हा सबंध ग्रंथ तयार करून प्रसिद्ध केला आहे. ह्यापासून प्राकृत जनांस सहज मूलार्थ समजून त्यांच्या मनासही आनंद होतो असें कानावर आल्यास श्रीभगवंतांनीं माझ्या श्रमाची कृतार्थता केली असें वाटेल.

मुक्काम **पनवेल**,
ता० २५ सप्टेंबर सन १९०८.

**पुस्तककर्ता.**



केरळकोकिळ-एडिटर-कृत.

# आर्याबद्ध श्रीमद्भगवद्गीता.

## अध्याय पहिला.

धृतराष्ट्र उवाच ।

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

धृतराष्ट्र-

आर्या.

जमुनी धर्मक्षेत्रीं कुरुच्या क्षेत्रीं करावया समर[1] ।
पंडूचे माझेही करिती ते काय संजया! कुमर[2] ॥ १ ॥

संजय उवाच ।

दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

संजय-

पांडवसैन्याची त्यां दुर्योधन पाहुनी तदा रचना ।
द्रोणाचार्यासन्निध येउनि राजा[3] वदे अशा वचना ॥ २ ॥

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

पाहें आचार्या! ही पांडवसेना असे अफाट किती ।
रचिली द्रुपदसुतानें[4] शिष्यहि तुमचाच जो विशालमती ॥ ३ ॥

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

---

१ युद्ध. २ पुत्र. ३ दुर्योधन. ४ धृष्टद्युम्नानें.

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥

**काशीराज धनुर्धर तेविं शिखंडी महारथी जाणा ।**
**धृष्टद्युम्न विराटहि सात्यकि ज्याचा अजिंक्य हा बाणा ॥१७॥**

द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक्पृथक् ॥ १८ ॥

**राजा द्रुपद नृपाळा! द्रौपदिचे पांच पुत्रही बा रे! ।**
**सौभद्रही महाभुज[1] अपुलाले शंख फुंकिती सारे ॥ १८ ॥**

स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥

**गेला प्रतिध्वनी तो कौरवहृदयांस भेदुनी पार ।**
**दुमदुमला आकाशीं पृथ्वीवरही तसाच अनिवार ॥ १९ ॥**

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥

**राहोनि सिद्ध सन्मुख घालाया घाव जे पहातात ।**
**ऐसे कौरव पाहुनि पार्थहि घेई धनुष्य हातांत ॥ २० ॥**

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

**अर्जुन उवाच ।**

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥

**मग तो हृषिकेशातें ऐसें भाषण वदे अगा राजा! ।**

**अर्जुन—**

**दोन्हीं सैन्यांमाजीं रथ करिं हा अच्युता! उभा माझा ॥२१॥**

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥

**पाहीन एकदां मी जे जे युद्धार्थ ठाकले आजी ।**
**कोणाशीं युद्ध मला आहे कर्तव्य ह्या रणामाजीं ॥ २२ ॥**

१ हे धृतराष्ट्रा!

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

**पाहेन मी मिळाले युद्धाचा जे धरूनियां हेत ।**
**दुर्बुद्धि कौरवांचे हितकर्तें कोण कोण आहेत ? ॥ २३ ॥**

**संजय उवाच ।**

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥

**संजय—**

**अर्जुन ऐसें वदतां राजा ! जो धांवणार हांकेला ।**
**दोन्ही चमूमधें[1] त्या उत्तम रथ यादवें उभा केला ॥ २४ ॥**

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥

**प्रमुखस्थानीं भीष्म द्रोण पहा अर्जुना ! ह्मणे बा रे ! ।**
**राजे समस्त हेही मिळती ह्या कौरवांस जे सारे ॥ २५ ॥**

तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन् पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥

**अर्जुन पाहे तेथें चुलते आजे बरे बरे मित्र ।**
**आचार्य बंधु मामा नातू पणतू कितीक सत्पुत्र ॥ २६ ॥**

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

**आप्त श्वशुर उभे त्या दोन्हीं सैन्यांत सिद्ध राहून ।**
**होते बंधुहि सारे त्यांतें अर्जुन समोर पाहून ॥ २७ ॥**

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।

**अर्जुन उवाच ।**

दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥

**दुःखें असें ह्मणे तो करुणेनें होउनी अति व्याप्त ।**

**अर्जुन—**

**कृष्णा पाहुनियां हे युद्धाला सिद्ध आपुले आप्त ॥ २८ ॥**

---

१ सैन्यांत.

सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥

**गात्रें माझीं विगलित होउनि मुखही सुकोनियां जाय ।**
**कांपे शरीर माझें थर थर रोमांच दाटले काय ! ॥ २९ ॥**

गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

**गांडीव पडे खालीं हातांतुनियां, त्वचा जळे सारी ।**
**न शकें उभें रहाया[१] मन हें माझें भ्रमे भ्रमे भारी ॥ ३० ॥**

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

**सारीं चिन्हें उलटीं देवा ! मज भासतात अवलोकीं ।**
**युद्धीं स्वजन वधोनी न दिसे कल्याण ह्या मला लोकीं ॥ ३१ ॥**

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥

**इच्छित नाहीं कृष्णा ! राज्याला कीं सुखास वा ! ज्या मी ।**
**तें राज्य भोग किंवा गोविंदा ! प्राण काय हो कामीं ॥ ३२ ॥**

येषामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥

**ज्यांच्या साठीं वाटे मिळवावें राज्य भोग सुख जाण ।**
**युद्धाला तेच उभे टाकुनियां आपुले धनप्राण ॥ ३३ ॥**

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥

**आचार्य पुत्र येथें आजोबा सोयरे तसे पितर ।**
**नातू शालक मामा दिसती कीं आप्त इष्टही इतर ॥ ३४ ॥**

एतान्न हंतुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥

**इच्छीं न हे वधाया कृष्णा ! मीं छेदिला जरी काय ।**
**त्रिभुवनराज्यास्तवही पृथ्वीचा पाड त्यापुढें काय ? ॥ ३५ ॥**

---

१ देह.

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

**मारूनि कौरवांना आम्हांला काय फायदा देवा? ।**
**हे दुष्ट मारिले जरि तरि पापाचाच जोडणें ठेवा ॥ ३६ ॥**

तस्मान्नार्हा वयं हंतुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

**उचित न यास्तव आम्हां वधणें हे कौरवादि जे आप्त ।**
**मारुनियां स्वजनांतें देवा! सुख होय-तें कसें प्राप्त? ॥ ३७ ॥**

यद्यप्येते न पश्यंति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥

**तिळभरि न पाहती ते लोभानें मूढबुद्धि जरि बा! हे ! ।**
**वंशक्षयदोष किती मित्रद्रोहांत पाप जें आहे ॥ ३८ ॥**

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

**आम्हीं समजुनि उमजुनि कैसें पापांतुनी न परतावें ।**
**वंशक्षयदोष सख्या ! पाहुनि तैसेंच काय वर्तावें? ॥ ३९ ॥**

कुलक्षये प्रणश्यंति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

**स्वकुलाचा क्षय होतां कुलधर्माची परंपरा मोडे ।**
**बुडतां[1] स्वधर्म सारा कुल नाशुनियां अधर्मही जोडे ॥ ४० ॥**

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यंति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

**होतां अधर्म कृष्णा ! दूषित[2] सार्‍या कुलस्त्रिया करतो ।**
**भ्रष्ट स्त्रियांमुळें हरि! शिरतो वंशांत वर्णसंकर तो ॥ ४१ ॥**

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतंति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

**कुलहंत्याचें[3] कुलही नेतो नरकांत वर्णसंकर कीं ।**
**पिंडोदकक्रियाही लोपुनि तत्पितर लोळती नरकीं ॥ ४२ ॥**

---

१ जडतो. २ दुराचारी. ३ वंशक्षय कर्त्याचें.

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यंते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

**ऐशा दोषांनीं ह्या कुलहंत्याची बुडोनियां जाती ।**
**जातीधर्म बुडोनी शाश्वतचे धर्मही लया जाती ॥ ४३ ॥**

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

**कुलधर्म सर्व गेल्या मनुजांचे ह्या जनार्दना ! सारे ।**
**नरकीं निश्चित राहे ऐसें मी नित्य आयकें बा ! रे ! ॥ ४४ ॥**

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हंतुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

**हाहा ! पाप किती हें निश्चित केलें अह्मीं कसें युद्ध ? ।**
**राज्यसुखाच्या लोभें माराया स्वजन जाहलों सिद्ध ! ॥ ४५ ॥**

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

**ह्यांच्या प्रतिकारार्थें न धरीं मी शस्त्र हा पहा नेम ।**
**कौरव सशस्त्र मातें वधितां समरीं बहू बहु क्षेम ॥ ४६ ॥**

**संजय उवाच ।**

एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

**संजय—**

**ऐसें बोलुनि युद्धीं टाकुनि तत्काल पार्थ शरचाप ।**
**टेंकुनि रथास बैसे उपजुनि चित्तांत शोकसंताप ॥ ४७ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णाऽर्जुनसंवादेऽर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

**पहिला अध्याय समाप्त.**

# अध्याय २ रा.

## संजय उवाच ।

तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

## संजय–

आर्या.

**करुणा उपजुनि पोटीं अश्रूंनीं नयन जाहले ओले ।**
**गहिंवर आला पाहुनि मधुसूदन[1] त्याजला असें बोले ॥ १ ॥**

## श्रीभगवानुवाच ।

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

## श्रीभगवान्–

**पार्था! या व्यसनीं[2] हा उपजे तुजलाच मोह कोठून? ।**
**शोभे अज्ञानाला देतो जो स्वर्गकीर्ति लोटून ॥ २ ॥**

क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

**क्लीबा[3]सम होउं नको उचित न हें अर्जुना! तुला आजी ।**
**क्षुद्रहृदयदुर्बलता टाकुनि दे ऊठ शूर तूं गाजी ॥ ३ ॥**

## अर्जुन उवाच ।

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

## अर्जुन–

**भीष्मद्रोण सख्या! हे पूज्य मला वाटती जसे प्राण ।**
**युद्धीं सोडूं कैसे त्यांवरि मी तीव्र आपुले बाण? ॥ ४ ॥**

---

१ श्रीकृष्ण. २ ह्या संकटसमयीं. ३ नेभळ्यासारखा.

गुरूनहत्वा हि महानुभावान् श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव भुंजीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

**वृद्ध गुरुस न वधावें भिक्षा खाणें बरें गमे जगतीं ।**
**स्वार्थैं गुरुवधरक्तें[1] दूषित भोगूं कशीं सुखें मग तीं? ॥ ५ ॥**

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
यानेव हत्वा न जिजीविषामस्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

**जय कीं अपजय बरवा वाटे आह्मांस हाहि संदेह ।**
**कौरव पुढें उभे हे वधुनी आह्मां न ठेवणें देह ॥ ६ ॥**

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥७॥

**न कळे कर्तव्य पडे संकट मति गुंग जाहली आजी ।**
**शिष्यत्वें शरण विभो! श्रेयस्कर तें विशंक पढवा जी! ॥७॥**

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद् यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

**इंद्रियशोषक[2] जाया शोकाला मार्ग ह्या दिसेना कीं ।**
**यो सार्वभौमपदवी किंवा यो आधिपत्यही नाकीं ॥ ८ ॥**

**संजय उवाच ।**

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥

**संजय–**

**शत्रूसि तापदेता अर्जुन कृष्णाप्रती वदोनि असें ।**
**गोविंदा! मी न करीं युद्ध कदा बोलुनी उगाच बसे ॥ ९ ॥**

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥

**दोन्ही सैन्यांमध्यें दुःखानें कंठ दाटुनी आला ।**
**सस्मितमुखें तयातें ऐसें श्रीकृष्ण बोलता झाला ॥ १० ॥**

---

१ वडिलांच्या हत्येच्या रक्तानें. २ इंद्रियें सुकविणारा.

**श्रीभगवानुवाच ।**

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥

**श्रीभगवान्–**

**अनुचित शोक तुझा हा   वदशी तूं पंडितांसमान जरी ।**
**पंडित करिति जित्याचा   मेल्याचाही कधीं न शोक परी ॥११॥**

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

**पूर्वीं नव्हती का हे?   मी तूं राजे समस्त सेनाही? ।**
**पुढतीं ह्यांतिल कोणी   नाहीं होणार कीं असें नाहीं ॥ १२ ॥**

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

**बाल्य जरा[१] यौवनही   येतें जीवास ह्याच देहांत ।**
**देहांतरही तैसें   धीर पडे जाणुनी न मोहांत ॥ १३ ॥**

मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तां स्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

**विषयेंद्रियेंच देती   सुखदुःखें शीत उष्ण हे भाग ।**
**होती जाती नश्वर[२]   पार्था ! ते सोसणें असे भाग ॥ १४ ॥**

यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

**तेही न देति बाधा   पार्था ! ज्या धैर्यशील पुरुषांशीं ।**
**सुखदुःखें सम ज्याला   होतो बा! तोच पात्र[३] मोक्षाशीं ॥१५॥**

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोऽतस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

**मिथ्या सत्यत्व नसे   नाहीं मिथ्यत्व तेंवि सत्याला ।**
**दोघांचा निर्णय हा   विदित असे नित्य तत्त्ववेत्त्यांला[४] ॥ १६ ॥**

१ वृद्धापकाल. २ क्षणिक. ३ योग्य. ४ तत्त्वज्ञान्यांना.

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

**व्यापी सर्व जगाला अविनाशी तत्त्व[1] एक जें फक्त ।**
**तें तों अव्यय त्याचा नाश कराया नसे कुणी शक्त[2] ॥ १७ ॥**

अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥

**मरती देहच सारे आत्मा हा बोलती सदा अमर ।**
**अतिगूढ अक्षयी तो ह्यास्तव पार्था ! उठें करीं समर ॥ १८ ॥**

य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥

**कोणी समजे मारी आत्मा कोणी ह्मणे स्वयें मरतो ।**
**दोघेहि नेणति ते मारि न कोणा कधीं न हा मरतो ॥ १९ ॥**

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥

**न कधीं जन्मे न मरे होणें जाणें जया न तनुसंगें[3] ।**
**शाश्वत[4] नित्य पुराणा[5] अज देहा मारितां न हा भंगे ॥ २० ॥**

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् ॥ २१ ॥

**अविनाशी अज अव्यय नित्य मनामाजि आण तूं ऐसा ।**
**तो पुरुष अर्जुना ! मग मारिल कोणास मारवी कैसा ? ॥ २१ ॥**

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥

**घेतो नवीन वस्त्रें टाकुनियां पुरुष जीं जुनीं तीं तीं ।**
**जीवात्मा देह जुने टाकुनि घेतो नवे तशा रीतीं ॥ २२ ॥**

नैनं छिंदन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥

---

१ आत्मा. २ समर्थ. ३ देहाबरोबर. ४ अमर. ५ अनादि. ६ जन्म नाहीं असा. ७ लयाला जात नाहीं.

न तुटे शस्त्रांनीं हा अग्नीनें हा जळे न तिळमात्र ।
जलहि न भिजवी याला सुकवाया वायुही नसे पात्र ॥ २३ ॥

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥

तोडाया जाळाया भिजवाया हा न येइ सुकवाया ।
नित्य स्तब्ध सनातन अचल व्यापी समस्तही ठाया ॥ २४ ॥

अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥

हा तों अचिंत्य[1] निर्गुण म्हणती आहे तसाच अविकारी ।
ह्यास्तव यथार्थ त्याला जाणुनि हा शोक दूर तूं सारीं ॥ २५ ॥

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥

जन्मे हाच फिरोनी मरतोही हाच मानिशी युक्त[2] ।
तरिही पार्था ! तुजला करणें हा शोक बा ! नसे उक्त[3] ॥ २६ ॥

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

झाला[4] निश्चित मरतो मेलेला जन्म घेतसे खचित ।
ह्यास्तव न टळे त्याचा शोकहि करणें तुला नसे उचित ॥ २७ ॥

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

आधीं जीवं[5] न दिसती मेल्यावरि शोधही नसे त्यांचा ।
मध्यें दिसती पार्था ! त्यासाठीं खेद काय कामाचा ? ॥ २८ ॥

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥

अद्भुत दिसतो कोणा कोणी म्हणती खरेंच अद्भुत हा ।
कोणी अद्भुत परिसे परिसुनि परि जाणती न यास[6] पहा ॥ २९ ॥

---

१ अतर्क्य. २ हेंच खरें. ३ योग्य. ४ जन्मास आलेला. ५ प्राणी. ६ ह्या जीवाला, आत्म्याला.

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥

**हा जीव सर्व देहीं नित्य नसे वध्य[1] तो महाभागा[2] ! ।**
**म्हणुनी कोणांविषयीं शोकालाही तुला नसे जागा ॥ ३० ॥**

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥

**निजधर्म पाहशी जरि तरिहि तुला भय पडूं नये कांहीं ।**
**कीं क्षत्रियांस धार्मिक युद्धावांचून अन्य सुख नाहीं ॥ ३१ ॥**

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभंते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥

**सहजीं युद्ध निघालें स्वर्गाचें द्वार उघडलें जाण ।**
**पार्था ! मिळे सुखाची दैवानें क्षत्रिया अशी खाण ॥ ३२ ॥**

अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥

**हें धर्मयुद्ध आतां ऐसें असुनी जरी न करशील ।**
**तरि तूं स्वधर्मकीर्ती बुडवुनियां पातकास वरशील[3] ॥३३॥**

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यंति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥

**दूषण अखंड देतिल लोक तुला काय हें दिसें नीट ।**
**संभावितास अपयश मरणाहुनि फार फार वाईट ॥ ३४ ॥**

भयाद्रणादुपरतं मंस्यंते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥

**ह्मणतिल भिऊन गेला समरांतुनि हा महारथी सारे ।**
**तूं त्यांस मान्य असतां येइल तुजला लघुत्त्व[4] बापारे ! ॥३५॥**

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यंति तवाहिताः ।
निंदंतस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

---

१ मारतां येण्यासारखा. २ पुरुषश्रेष्ठा ! ३ जोडशील. ४ हलकेपणा.

बोलूं नये असेंही शत्रु तुझे बोलतील एकसरें[1]।
निंदुनि सामर्थ्याला त्याहुनियां दुःख कोणतें दुसरें ? ॥३६॥

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

मरशी तरि कीर्ति मिळे जय आल्या भोग सर्वही धरणीं[2]।
ह्याकरितां ऊठ सख्या ! निश्चित करिं सर्वथैव युद्ध रणीं ॥

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥

लाभालाभ जयाजय समसम मानूनि सौख्यसंताप ।
मग युद्धारंभ करीं न घडे तेणें तुला मुळीं पाप ॥ ३८ ॥

एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।
बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि ॥ ३९ ॥

कथिलें तत्त्व[3] तुला हें योगाची बुद्धि आयकें पुढतीं ।
ही बुद्धि साध्य होतां कर्मांचे बंधही तुझ्या तुटती ॥ ३९ ॥

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

नाहीं अपूर्णता त्या होईना विघ्न त्यांत संयुक्त ।
स्वल्पहि धर्म करी हा मोठ्या मोठ्या भयांतुनी मुक्त ॥ ४० ॥

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

पार्था ! निश्चित ऐशी असते कीं बुद्धि एक या वाटे ।
कामुक[4] अनंतबुद्धी धरितो ज्यांना अनेकविध फांटे ॥ ४१ ॥

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः ।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥

पडतात मूर्ख भुलुनी वेदांच्या स्वर्गवर्णनावरते ।
श्रुतिवादमग्न[5] ऐसे ह्मणती कांहीं नसेच त्यापरतें[6] ॥ ४२ ॥

---

१ एकसारखें. २ पृथ्वी. ३ सांख्ययोग. ४ फलेच्छा धरणारा. ५ वेदोक्त वाद करणारे. ६ त्याच्याहून श्रेष्ठ.

कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥

**स्वर्गास लुब्ध जे ते इच्छिति जन जन्मकर्मफलभोग ।**
**भोगैश्वर्य जयाला कर्माचेही अनेकविध योग ॥ ४३ ॥**

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

**भोगैश्वर्या भुलतां कामें तच्चित्त होतसे व्यग्र ।**
**त्यांची कधींच नाहीं होत समाधींत बुद्धि एकाग्र ॥ ४४ ॥**

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।
निर्द्वंद्वो नित्यसत्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

**त्रिगुणात्मक वेदहि हे निर्गुण हो सर्वथैव तूं बा! हे! ।**
**आत्मज्ञ[1] नित्य निश्चित[2] पार्था! निर्द्वंद्व होउनी राहे ॥ ४५ ॥**

यावानर्थ उपदाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

**कूपीं[3] कार्यें जीं जीं तीं तीं डोहांत सर्वही घडती ।**
**तैशीं वेदोक्त फळें ब्रह्मज्ञान्यास सर्व सांपडती ॥ ४६ ॥**

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥

**कर्मीं अधिकार तुला नाहीं कधिंही तुझा फलावरती ।**
**कर्में टाकुं नको परि सोडुनि फलहेतु सर्वही कर तीं ॥४७॥**

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

**कर्में योगस्थ[4] करीं टाकुनि इच्छा समस्त फलभोग ।**
**मानुनि सिद्धि असिद्धी सम समवृत्तीस बोलती योग ॥४८॥**

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥

**बा! कर्म बुद्धियोगा- पुढती पार्था! खरेंच फार उणें ।**
**बुद्धीला शरण रिघें सोड फलेच्छा सदैव तुच्छपणें ॥४९॥**

१ आत्मस्वरूप जाणणारा. २ अविकारी. ३ विहीरीमध्यें. ४ योगात्मक.

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

**नाशुनि टाकी पापें पुण्येंही बुद्धियुक्त इहलोकीं ।**
**ह्यास्तव योग करीं तूं कर्मी हा कुशल योग अवलोकीं ॥५०॥**

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥

**सद्बुद्धियुक्त पंडित कर्माचें फल समस्त सोडून ।**
**जाती निर्दोष पदा सारा संसारबंध तोडून ॥ ५१ ॥**

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गंतासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

**जेव्हां बुद्धीनें तूं मोहजलाशय समग्र तरशील ।**
**श्रुत अश्रुत भोगाचें तेव्हां वैराग्य तूंहि वरशील ॥ ५२ ॥**

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

**त्वद्बुद्धि ऐकुनीयां विविधमतें संशयें अति व्याप्त ।**
**होइल समाधिमाजी स्थिर तेव्हां योगही तुला प्राप्त ॥ ५३ ॥**

**अर्जुन उवाच ।**

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।
स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥

**अर्जुन—**

**स्थितधी असतो कैसा ? कैंवि समाधींत राहणें लागे ।**
**कृष्णा ! बोल कैसा असतो कैसा कसा जगीं वागे ? ॥ ५४ ॥**

प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥

**पार्था ! सर्व मनेच्छा टाकिल जेव्हां समस्तही सुज्ञ ।**
**तुष्टे मनें स्वरूपीं म्हणती त्यालाच वा ! स्थितप्रज्ञ ॥ ५५ ॥**

१ बुद्धिमान्. २ मोहरूप समुद्र. ३ ऐकलेल्या. ४ न ऐकलेल्या. ५ अनेक प्रकारचीं मतें. ६ स्थिरबुद्धि झालेला मनुष्य. ७ स्थिरबुद्धि.

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥

**निस्पृह[1] सुखांत राहे दुःखीं उद्विग्न जो नसेच कधीं ।**
**भय काम क्रोध नसे म्हणती त्यालाच कीं मुनि स्थिरधी ॥५६॥**

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥

**कोठेंही प्रेम नसे भोगी[2] येतां भलें बुरें कांहीं ।**
**न धरी आवड नावड त्याची स्थिरबुद्धि जाहली पाहीं ॥ ५७॥**

यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

**कूर्मासमानें[3] काढी विषयावरुनी समस्त जो धीर ।**
**सर्वेंद्रियांस[4] त्याची जाणावी बुद्धि जाहली स्थीर ॥ ५८ ॥**

विषया विनिवर्तंते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

**कोणी विषय त्यागें[5] देती टाकूनि भक्तही इष्ट ।**
**परि इच्छा राहे ती होते बा ! ब्रह्मदर्शनें नष्ट ॥ ५९ ॥**

यततो ह्यपि कौंतेय पुरुषस्य विपश्चितः ।
इंद्रियाणि प्रमाथीनि हरंति प्रसभं मनः ॥ ६० ॥

**ज्ञानी पुरुष असोनी पार्था ! जरि नित्य यत्नही करतो ।**
**इंद्रियगणहि[6] बळी हा हट्टानें तन्मनासही हरतो ॥ ६० ॥**

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।
वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

**तीं सर्व आवरोनी होउनियां युक्त ऐक्यरूप मज ।**
**इंद्रियगण वश ज्याला स्थिर त्याची बुद्धि जाहली समज ॥६१॥**

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।
संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥

---

१ निरिच्छ. २ उपभोग घेतो. ३ कासवाप्रमाणें. ४ सर्व इंद्रियांना. ५ कोणी त्या.गानें सारे विषयच टाकून देतात. ६ इंद्रियसमुदायही.

चिंती नर जो विषया उपजे त्याला सदैव अनुराग[1] ।
अनुरागें काम[2] उठे कामापासून येतसे राग[3] ॥ ६२ ॥

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

क्रोधानें मोह उठे मोहानें तो स्मृतिभ्रमीं जाय ।
स्मृति नाशे मतिनाशे मतिनाशें होय तो मृतप्राय ॥ ६३ ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिंद्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

रागद्वेषां सोडुनि यत्नानें इंद्रियांस जो वळवी[4] ।
सेवुनि विषय सदाही शुद्धमनानें प्रसाद तो मिळवी ॥ ६४ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

मिळतां प्रसाद दुःखें नाशुनियां सर्व होतसे शुद्धी ।
चित्त प्रसन्न होतां सुस्थिर होऊनि राहते बुद्धी ॥ ६५ ॥

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥

बुद्धि अयुक्तांस[5] नसे ध्यानहि नाहीं तसें अयुक्ताला ।
ध्यानाविण शांति नसे कोठुनि सुख ये अशांत भक्ताला ॥ ६६ ॥

इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवांभसि ॥ ६७ ॥

इंद्रियगण वावरतां[6] सोडी मन मोकळें सुखें जो कां ।
हरि तें बुद्धि तयाची वायु जशी नेतसे जलीं नौका ॥ ६७ ॥

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

ह्यास्तव निग्रह करुनी काढी जो इंद्रियें महासुज्ञा! ।
विषयांवरून सारीं सुस्थिर त्याचीच होतसे प्रज्ञा[7] ॥ ६८ ॥

---

१ प्रीति. २ इच्छा. ३ क्रोध. ४ वश करून घेतो. ५ अज्ञानाला. ६ चालत असतां. ७ बुद्धि.

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

प्राण्यांची सर्व निशा[1] तेथें हा आत्मसंयमी[2] जागे ।
प्राणी जागृत असती ती मुनिच्या रात्र हें मनीं वागे ॥ ६९ ॥

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशंति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशंति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी ॥ ७०

नाना जलौघ येतां सिंधु न फुगतां जिरूनियां[3] जाती ।
भोगी भोग तसे त्या शांति मिळे जी न कामुकाला[4] ती ॥ ७० ॥

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति ॥ ७१ ॥

टाकुनि समस्त इच्छा निस्पृह वागावया जया साधे ।
मी कीं माझें न जया त्या पुरुषालाच शांति ही लाधे[5] ॥ ७१ ॥

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामंतकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

ही ब्रह्मस्थिति[6] येतां राहेना मोह अर्जुना! जाण ।
राहेल अंतकालीं तरि पावे ब्रह्मरूप निर्वाण[7] ॥ ७२ ॥

इति श्रीमद्भगवद्गीता० सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

दुसरा अध्याय समाप्त.

---

१ रात्र. २ मनोनिग्रह करणारा. ३ ज्याच्यासाठीं आटा पीट करतात. ४ विषयलंपट पुरुषाला. ५ मिळते. ६ ब्रह्म स्वरूपाची अवस्था. ७ मोक्ष.

# अध्याय ३ रा.

अर्जुन उवाच ।

ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।
तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥

**जरि थोर देवदेवा ! कर्माहुनि बुद्धि वाटते तुजला ।**
**तरि ह्या अघोर[1] कर्मीं योजिसी कां तूं जनार्दना ! मजला ॥ १ ॥**

व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।
तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥

**संदिग्ध[2] बोलुनीयां माझ्या बुद्धीस पाडिशी मोह ।**
**एकचि सांग तरी मज श्रेयस्कर[3] होय जें असंदेह[4] ॥ २ ॥**

श्रीभगवानुवाच ।

लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।
ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥

**दोंपरि निष्ठा लोकीं असती पूर्वीच बोलिलों आहें ।**
**ज्ञानानें ज्ञान्याला कर्मानें कर्मयोगिया पाहें ॥ ३ ॥**

न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।
न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥

**कर्मारंभ न केला म्हणुनी निष्कामता न साधेल ।**
**तैसेंच कर्म टाकुनि विजया ! ती सिद्धिही न पावेल ॥ ४ ॥**

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥

**क्षणहि कधीं कोणाचा जाय न केल्याविणें जगीं कर्म ।**
**करविति बळेंच कर्मैं मायेचे हे समस्त गुणधर्म ॥ ५ ॥**

---

१ युद्धासारख्या भयंकर. २ संशयित. ३ कल्याणकारक. ४ निःसंशय.

कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।
इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥

**कर्मेंद्रियांस अवरुनि मनिं चिंतुनि विषय आणितो सोंग ।**
**तो मूर्ख विषयलंपट कृतिला त्या बोलती जगीं ढोंग ॥ ६ ॥**

यस्त्विंद्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेंद्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

**जो सर्व इंद्रियांचा मोडी स्वमनेंकरूनियां जोर ।**
**निष्काम कर्मयोगा आरंभी तोच अर्जुना ! थोर ॥ ७ ॥**

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥

**करिं नित्य कर्म तूं कीं त्यागाहुनि कर्म हें असे श्रेष्ठ ।**
**टाकुनियां कर्म तुझा देहहि हा चालणें महा कष्ट[1] ॥ ८ ॥**

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः ।
तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसंगः समाचर ॥ ९ ॥

**यज्ञप्रीत्यर्थ[2] न जें तें सारें कर्म होय बद्धकर ।**
**टाकूनि संग पार्था ! ह्यास्तव यज्ञार्थ तूंहि कर्म कर ॥ ९ ॥**

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥

**यज्ञांसह[3] जन[4] निर्मुनि वाणी विधि[5] बोलिला तई शुभ ती ॥**
**यज्ञें भाग्यासि चढा जणुं तुमची कामधेनु ही दुभती ॥ १० ॥**

देवान्भावयतानेन ते देवा भावयंतु वः ।
परस्परं भावयंतः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

**यज्ञें देवासि भजा तुमचें करितील ते परित्राण[6] ।**
**ऐसें प्रेम परस्पर जडतां होईल कोट कल्याण ॥ ११ ॥**

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यंते यज्ञभाविताः ।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुंक्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥

१ फार कठीण. २ ब्रह्मार्पण. ३ यज्ञाबरोबरच. ४ लोक. ५ ब्रह्मदेव. ६ कल्याण.

**यज्ञें पूजित[1] देवहि देतिल तुम्हांस इष्ट फल थोर ।**
**देवांनीं दिधलें तें त्यांना देतां न खाय तो चोर[2] ॥ १२ ॥**

यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः ।
भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ॥ १३ ॥

**[3]दवडिति पापें सारीं यज्ञाचें भक्षणार अवशिष्ट ।**
**पापी पापच खाती शिजविति जे स्वोदरार्थ[4] बहु मिष्ट ॥ १३ ॥**

अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।
यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥

**अन्नापासुनि भूतें[5] पर्जन्यें होय अन्नसंवृद्धी ।**
**यज्ञें पर्जन्य पडे यज्ञाची कर्म हें करी सिद्धी ॥ १४ ॥**

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

**वेदोद्भव कर्म असे ब्रह्मापासूनि वेदही ज्ञात[6] ।**
**म्हणुनी सर्वव्यापी तिष्ठे[7] तें ब्रह्म नित्य यज्ञांत ॥ १५ ॥**

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

**चालत आल्या ऐशा चक्राला चालवीन त्याच गती ।**
**पापी विषयीं लंपट पार्था ! तो व्यर्थ वांचला जगतीं ॥ १६ ॥**

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।
आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥

**आत्म्यामध्येंच रमतो आत्म्यामध्येंच तृप्त जो राही ।**
**संतुष्ट आत्मरूपीं त्याला कर्तव्यही [8]नुरे कांहीं ॥ १७ ॥**

नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।
न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

**न फळे कर्म तयाला त्यजितां लागे न दोषही त्यास ।**
**कोणापासुन कांहीं मिळवायाची कधीं न ज्या आस ॥ १८ ॥**

---

१ पूजा केलेले, तृप्त केलेले. २ कृतघ्न. ३ नाश करतात. ४ आपल्याच पोटाकरितां. ५ प्राणी. ६ सर्वविश्रुत. ७ राहतें. ८ उरत नाहीं.

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

ह्यास्तव निष्काम[1] असा होउनि तूं करिं सदैव कर्तव्य ।
निष्काम कर्म करितां ब्रह्मपदीं पुरुष तो मिळे दिव्य[2] ॥ १९ ॥

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

जनकादिकही सारे करुनी कर्मंच पावले सिद्धी ।
लोकाचारार्थ[3] तरी वळवीं कर्मांकडे तुझी बुद्धी ॥ २० ॥

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

ज्ञाता जें जें करितो तें तें करितात बाकिचे लोक ।
तो जे जे नियम करी तैसे जन वागतात अवलोक ॥ २१ ॥

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥

त्रैलोक्यांतहि पार्था ! मजला कर्तव्य हें न अणुमात्र[4] ।
दुर्मिळ असें न कांहीं तरि करितों कर्म मी अहोरात्र ॥ २२ ॥

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतंद्रितः ।
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

लोकांत मीच पार्था ! केलें नाहीं झटून कर्म जरी ।
तैसेंच करित येतिल माझ्या मागून लोक सर्व तरी ॥ २३ ॥

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

न करीं मी कर्म जरी तरि होतिल पतित[5] लोक हे स्पष्ट ।
किंवा करीन भलतें तरि होइल सर्व ही प्रजा भ्रष्ट ॥ २४ ॥

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वंति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

---

१ निरिच्छ. २ सतेज. ३ लोकशिक्षणासाठीं. ४ लेशभरही. ५ भ्रष्ट, कर्मच्युत.

**कर्में अज्ञान जशीं लोभाच्या करिति लागुनी पाठीं ।**
**ज्ञाते तशींच करितीं निर्लोभें लोकसंग्रहासाठीं ॥ २५ ॥**

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

**अज्ञान कर्मठाच्या चित्तीं दुष्कल्पना न भरवावी ।**
**तत्त्वज्ञ युक्त जो कां त्यानें कर्में समस्त करवावीं ॥ २६ ॥**

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥

**मायेच्याच गुणांनीं घडतीं कर्में जगामधें सारीं ।**
**कर्ता मीच तयांचा म्हणुनि पडे मूर्ख तो अहंकारीं ॥ २७ ॥**

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
गुणा गुणेषु वर्तंत इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

**गुणकर्मविभागांचें तत्व कळे अर्जुना ! जया युक्त ।**
**तो, इंद्रियेंच विषयीं रमती, मानुनि न होय आसक्त ॥ २८ ॥**

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जंते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मंदान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

**प्रकृतिगुणीं मूढ सदा होती विषयेंद्रियांमधें मग्न ।**
**अज्ञान मूढ जे कां तन्मन सुज्ञें करूं नये भग्न ॥ २९ ॥**

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥

**सारीं कर्में अर्पीं मज तूं ठेवूनि आत्मपरबुद्धी ।**
**सोडुनि आशा ममता टाकुनि दुःखें सुखें शिरें युद्धीं ॥ ३० ॥**

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः ।
श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥

**मन्मत न निंदितां जे ग्रहण करायासि नित्य झटतील ।**
**श्रद्धा ठेवुनि सारे त्यांचेही कर्मबंध तुटतील ॥ ३१ ॥**

---

१ लोकहितार्थ. २ विकल्प. ३ तत्त्वजाणणारा जो ज्ञाता असेल त्यानें. ४ लंपट, लुब्ध. ५ मायेच्या गुणांमुळें. ६ आत्मनिष्ठेमध्यें बुद्धि ठेवून.

ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम् ।
सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

**जे न अनुष्ठिति[1] माझ्या ठेवुनियां दोष ह्या मतालागीं ।**
**सर्व ज्ञानामाजीं जाणें ते मूढबुद्धि हतभागी ॥ ३२ ॥**

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यांति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥

**ज्ञानीही पूर्वींच्या संस्कारें प्रकृतिमागुनी जाय ।**
**मायाधीन प्राणी निग्रह[2] तेथें करी तरी काय? ॥ ३३ ॥**

इंद्रियस्येंद्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

**प्रिय विषयीं प्रेम बहु अप्रिय तद्वेष इंद्रियां भारी ।**
**प्रीतिद्वेषचि रिपु हे आवें[3] त्यांच्या कधीं न आहारीं ॥ ३४ ॥**

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥

**उत्तम परधर्माहुनि हितकर विगुण[4] स्वधर्म-आचरण ।**
**बहु परधर्म भयंकर निजधर्मी श्रेयदें[5]ही मरण ॥ ३५ ॥**

**अर्जुन उवाच ।**

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥

**अर्जुन–**

**आतां कोण प्रेरी पापें हा पुरुष जो सदा सेवी ।**
**इच्छा नसतां कृष्णा! कोणीं मुद्दाम धाडिला जेवीं ॥ ३६ ॥**

**श्रीभगवानुवाच ।**

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥

**श्रीभगवान्–**

**हा काम हाच कोपहि उद्भवतो जो रजोगुणें लोकीं ।**
**खादाड फार पापी आहे हा शत्रु नीट अवलोकीं ॥ ३७ ॥**

---

१ भजत नाहींत. २ मनःसंयम. ३ तोंडांत. ४ गौण. ५ श्रेयस्कर.

धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

**धूम्र जसा अग्नीतें झांकुनियां धूळ आरसा टाकी ।**
**गर्भास गर्भवेष्टण तैसें हें सर्व काम हा झांकी ॥ ३८ ॥**

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौंतेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

**ज्ञानास हाच वेष्टी ज्ञान्याचा नित्य शत्रु हाच खरा ।**
**इच्छारूप अघाशी पार्था ! खादाड अग्नि हा दुसरा ॥ ३९ ॥**

इंद्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

**मन बुद्धि इंद्रियें हें त्याचें म्हणतात कीं अधिष्ठान[1] ।**
**त्यांच्या द्वारें जीवां पाडी मोहांत वेष्टुनी ज्ञान ॥ ४० ॥**

तस्मात्त्वमिंद्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

**ह्यास्तव पार्था ! तूंही आधीं जिंकूनि इंद्रियें सारीं ।**
**विज्ञानज्ञानाचा नाशक हा दुष्ट काम संहारीं ॥ ४१ ॥**

इंद्रियाणि पराण्याहुरिंद्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥

**स्थूलाहुनि इंद्रियगण त्याहूनिही श्रेष्ठ हें मन स्पष्ट ।**
**बुद्धि श्रेष्ठ मनाहुनि, आत्मा आहे तिच्याहुनी श्रेष्ठ ॥ ४२ ॥**

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

**बुद्धीहुनि थोर असा जाणुनि आत्मा मनेंकरूनि पहा ।**
**हा कामरूप टाकीं मारुनि पार्था ! अजिंक्य शत्रु महा ॥४३॥**

इति श्रीमद्भगवद्गीतायां ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे सूपनिषत्सु श्रीकृष्णा-
ऽर्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

**तिसरा अध्याय समाप्त.**

---

१ वसतिस्थान.

# अध्याय ४ था.

### श्रीभगवानुवाच ।

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥

### श्रीभगवान्–

**प्राचीन योग अव्यय[1] हा मी सूर्यासि बोलिलों आगें ।**
**तो मनुला सूर्य वदे मनुही इक्ष्वाकुला पुढें सांगे ॥ १ ॥**

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

**ऐशा परंपरेनें राजर्षींनींहि जाणिला स्पष्ट ।**
**बहु काल लोटतां त्या पार्था! परि योग होय तो नष्ट ॥ २ ॥**

स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

**तुज तोच आज मी हा पूर्वींचा योग बोलिलों उक्त ।**
**अद्भुत रहस्य उघडी कीं तूं आहेस मत्सखा भक्त ॥ ३ ॥**

### अर्जुन उवाच ।

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।
कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

### अर्जुन–

**आतांचा जन्म तुझा सूर्याचा जन्म तो अनादि असे ।**
**कथिलास तूंच पूर्वीं जाणूं मी ह्यांत सांग काय कसें ? ॥ ४ ॥**

### श्रीभगवानुवाच ।

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥

---

[1] सनातन.

श्रीभगवान्–

गेले कितीक माझे जन्म तुझे अर्जुना! जगावरती ।
ते सारे स्मरति मला पार्था! तुजला जरी न ते स्मरती ॥५॥

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

आहें अव्यय अज मी प्राण्यांचा सर्वथैव ईश जरी ।
घेऊन मत्प्रकृतिला मायात्मक जन्म घेतसेंच तरी ॥ ६ ॥

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥

जेव्हां जेव्हां पार्था! धर्माचा ऱ्हास होउनी जातो ।
वाढे अधर्म जगतीं तेव्हां मी जन्म घेउनी येतों ॥ ७ ॥

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

साधूंतें रक्षाया दुष्ट जनांचें करावया हनन ।
स्थापाया धर्म पुन्हा होतें माझें युगायुगीं जनन ॥ ८ ॥

जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।
त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥

अद्भुत जन्में कर्में माझीं हीं जाणिलीं खरीं जेणें ।
देहांतीं मज पावुनि पुनरपि जन्मास त्या नसे येणें ॥ ९ ॥

वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।
बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥

रागभय क्रोधरहित मन्मय होउनि मदाश्रयें असती ।
ज्ञानतपें पावन बहु होउनि मद्रूप ते सुखें वसती ॥ १० ॥

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।
मम वर्त्मानुवर्तंते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥

जे जैसे भजती मज त्यांना त्यांना तसाच मी फळतों ।
मानवसमाज पार्था! माझ्या मार्गेंच सर्वथा वळतो ॥ ११ ॥

---

१ अजन्मा. २ नाश, निर्दाळण.

काङ्क्षंतः कर्मणां सिद्धिं यजंत इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

**इच्छुनि कर्मसिद्धी पूजिति जे इष्ट देव अवलोकीं ।**
**कर्मोद्भव[1] सिद्धि अशी मिळते लौकर तयांस नरलोकीं ॥१२॥**

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥

**गुणकर्म पाहुनी मीं केलें निर्माण चार वर्णांशीं ।**
**कर्ता त्यांचा मी तरि जाण अकर्ता असून अविनाशी ॥ १३ ॥**

न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बद्ध्यते ॥ १४ ॥

**मज बाधती न कर्मे कर्मफलाची नसे मला चाड ।**
**जाणे अशा मला त्या येईना कर्मबंधही आड ॥ १४ ॥**

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

**पूर्वी मुमुक्षुंनींही केलें हें कर्म जाणुनी ऐसें ।**
**ह्यास्तव कर्मच करिं तूं केलें त्या पूर्वपूर्वजीं जैसें ॥ १५ ॥**

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

**ज्ञान्यांसहि मोह पडे कर्म कसें तें अकर्महीं उक्त ।**
**कर्म तुला कथितों जें ऐकुनि होशी अमंगलीं[2] मुक्त ॥ १६ ॥**

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।
अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥

**कर्महि जाणुनि घ्यावें जाणुनि घ्यावें विकर्म तेंहि कसें ।**
**समजुनि अकर्म घ्यावें कीं कर्मांचा विचार गूढ असे ॥ १७ ॥**

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

**कर्मीं अकर्म पाहे कर्म अकर्मांत नित्य अवलोकी[3] ।**
**तो बुद्धिमंत मनुजीं युक्तहि कृतकृत्य तोच या लोकीं ॥ १८ ॥**

---

१ कर्मांपासून प्राप्त झालेली. २ पापांतून. ३ पाहतो.

यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पंडितं बुधाः ॥ १९ ॥

**जो कर्मारंभ करी इच्छा संकल्प सोडुनी सारे ।**
**ज्ञानाग्निदग्ध कर्मी पंडित त्यालाच बोलती बा रे! ॥ १९ ॥**

त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥

**सोडुनि कर्मफलेच्छा तृप्त सदा जो निराश्रयें राही ।**
**कर्मी प्रवर्तला तो सान्या तरिही करी न तो कांहीं ॥ २० ॥**

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥

**आशा न परिग्रह कीं स्वाधिन तनुमन जया अपोआप ।**
**केलें शरीरमात्रें कर्म तरी त्याजला नसे पाप ॥ २१ ॥**

यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।
समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥ २२ ॥

**बहु तुष्ट सहज लाभें निर्मत्सर भेद सोडुनी शुद्ध ।**
**ज्याला सिद्धि असिद्धी सम तो बांधूनही नव्हे बद्ध ॥ २२ ॥**

गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।
यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

**निष्काम मुक्त जो कां ज्ञानीं यन्मन करीतसे निलयां ।**
**यज्ञार्थ कर्म करितां सारें तत्कर्म जातसे विलया ॥ २३ ॥**

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

**द्रव्यें हुताश कर्ता ब्रह्म ब्रह्मांत अर्पितों मानी ।**
**कर्मसमाधिस्थ अशा ब्रह्माला तोच पावतो ज्ञानी ॥ २४ ॥**

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

**देवानिमित्त योगी यज्ञाचीही उपासना करिती ।**
**ज्ञानी ब्रह्माग्निमधें टाकिति होमूनि सर्व यज्ञरिती ॥ २५ ॥**

---

१ कशावरही अवलंबून नाहीं, असा. २ वास करतें, राहतें.

श्रोत्रादीनींद्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इंद्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

**श्रोत्रादि इंद्रियें हीं निग्रह–अग्नींत होमिती अन्य ।**
**इंद्रिय–अग्नींत कुणी होमुनि विषयांस मानिती धन्य ॥ २६ ॥**

सर्वाणींद्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

**संयमयोगाग्नि बरा पेटवुनी चित्प्रकाशक[1] ज्ञानी ।**
**प्राणेंद्रिय कर्मांतें होमुनियां त्यांत धन्यता मानी ॥ २७ ॥**

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

**कोणी द्रव्यतपाचा मख[2] करिती योगयज्ञही योगी ।**
**वेदार्थज्ञानाचा कोणी करितात यज्ञ उद्योगी ॥ २८ ॥**

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

**प्राण अपानीं प्राणीं अपान जाळिति किती उदारमती ।**
**प्राणापाननिरोधें प्राणायामांतही कुणी रमती ॥ २९ ॥**

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

**कोणी मित आहारें प्राणीं प्राणास जाळिती बापा! ।**
**ते सर्व यज्ञवेत्ते यज्ञानें क्षालितात जे पापा ॥ ३० ॥**

यज्ञशिष्टामृतभुजो यांति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥

**यज्ञाचें शेषामृत सेविति ते ब्रह्म होति एकसरां[3] ।**
**यज्ञाविण लोक नसे हाही कोठून त्यास ये दुसरा ॥ ३१ ॥**

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।
कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥

**स्वमुखें वर्णन करुनी यज्ञ असे विधि अनेकविध सांगे ।**
**कर्मोद्भव ते सारे जाणुनियां मुक्त होय तूं आंगें ॥ ३२ ॥**

---

१ ज्ञानाचा प्रकाश पाडणारा. २ यज्ञ. ३ एकदम.

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

**ज्ञानाचा, द्रव्याच्या यज्ञाहुनि यज्ञ थोर हा भारी ।**
**कर्मैं जीं असतीं तीं पार्था! ज्ञानांत संपती सारीं ॥ ३३ ॥**

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यंति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

**सेवा प्रश्न करोनी भावें संतांसि वांकवीं मान ।**
**तत्त्वज्ञ ज्ञाते तैं तुजला उपदेशितील तें ज्ञान ॥ ३४ ॥**

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

**तें जाणल्यावरी तूं पावशि पार्था! पुन्हा न मोह कदा ।**
**मग आपणांत सारे प्राणी पाहुनि घडे मदैक्य सदा ॥ ३५ ॥**

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥

**असशिल जरी दुरात्मा पाप्यांमाजीहि पातकी फार ।**
**ही ज्ञानरूप नौका करिल तरी पापसागरीं पार ॥ ३६ ॥**

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥

**अग्नि प्रदीप्त होतां ज्ळती काष्ठें जशीं सुकीं ओलीं ।**
**ज्ञानाग्नी भस्म तशी करितो हा पापपुण्यलाखोली ॥ ३७ ॥**

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ ३८ ॥

**नाहीं पवित्र कोणी ज्ञानासम ह्या जगामधें झालें ।**
**तें ज्ञान योगयत्नें ज्ञाता मिळवी मनीं यथाकालें ॥ ३८ ॥**

श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥

**श्रद्धाळू विजितेंद्रिय तत्पर त्यालाच लाभतें ज्ञान ।**
**होतां ज्ञानप्राप्ती शीघ्र मिळे थोर शांतिचें स्थान ॥ ३९ ॥**

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

**बुडतो संशयबुद्धी अज्ञ तसा भक्तिहीन जाण सदा ।**
**इहपर लोकहि नाहीं संशयबुद्धीस सौख्यही न कदा ॥ ४० ॥**

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवंतं न कर्माणि निबध्नंति धनंजय ॥ ४१ ॥

**संन्यासें योग करी ज्ञानानें सर्व संशय च्छेदी ।**
**आत्मज्ञ अर्जुना! ज्ञो कर्म तया बद्धही करूं नेदी ॥ ४१ ॥**

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

**ह्यास्तव अज्ञानात्मक संशय हा शुद्ध ज्ञांकली सूठ ।**
**ज्ञानासीनें[1] छेदुनि पार्था! तूं कर्म हें करीं ऊठ ॥ ४२ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णा-
ऽर्जुनसंवादे ज्ञानयोगो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

**चवथा अध्याय समाप्त.**

१ ज्ञानरूप तरवारीनें.

# अध्याय ५ वा.

### अर्जुन उवाच।

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥

### अर्जुन–

**कर्मन्यास कथोनी कथिशि पुन्हा योगही यथा[1]सांग।**
**ह्यांतील एक कृष्णा! श्रेयस्कर[2] तेंच निश्चयें सांग ॥ १ ॥**

### श्रीभगवानुवाच।

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥

### श्रीभगवान्–

**संन्यास कर्मयोगीं[3] दोहींतहि सारखेंच कल्याण।**
**तरि त्यांत योग आहे संन्यासाहून थोर हें जाण ॥ २ ॥**

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति।
निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥

**भेदाभेद न इच्छा द्वेष करीना कधींच अन्यासी।**
**बंधांतुनि सहज सुटे जाणावा तोच नित्य संन्यासी ॥ ३ ॥**

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः।
एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥

**हे सांख्य योग अज्ञां भिन्न, परी पंडितां न हे भिन्न।**
**एकच अनुष्ठितां[4] कीं दोघांचें फळ मिळे अविच्छिन्न ॥ ४ ॥**

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते।
एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥

**सांख्यानें मिळतें जें योगानेंही मिळे तसें स्थानें[5]।**
**सांख्या योगा पाहे एकत्वें दिव्यदृष्टि[6] तो मानें[7] ॥ ५ ॥**

१ सविस्तर. २ कल्याणकारक. ३ कर्मयोगामध्यें. ४ अभ्यास केला असतां. ५ पद. ६ अंतर्ज्ञानी. ७ समज.

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

**पार्था! संन्यास तरी दुर्घट कर्माविणें असे पार्हीं ।**
**कर्माच्या योगानें ब्रह्महि पावे मुनीस लवलाहीं ॥ ६ ॥**

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।
सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

**विजितात्मा[1] शुद्धात्मा[2] इंद्रियजय साधुनी रमे योगीं[3] ।**
**आत्मा सकल जिवांचा करुनी सारें अलिप्तता[4] भोगी ॥ ७ ॥**

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यन्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपन्श्वसन् ॥ ८ ॥

**अशनीं[5] वासग्रहणीं शयनीं श्रवणींहि दर्शनीं गमनीं ।**
**स्पर्शीं श्वासीं न करी कांहीं तत्त्वज्ञ मी ह्मणे स्वमनीं ॥ ८ ॥**

प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥

**देतां घेतां वदतां डोळ्यांची उघडझांपही करितां ।**
**विषयांत इंद्रियें हीं वागति मानूनि जो असे परता[6] ॥ ९ ॥**

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥

**ब्रह्मीं अर्पुनि कर्मैं करि जो राहुनि अलिप्त सर्वत्र ।**
**पापें लिप्त नसे तो कमलाचें जेंवि का जळीं पत्र[7] ॥ १० ॥**

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥

**देहेंद्रियबुद्धीनें स्वमनें योगीहि वासनारहित ।**
**निजचित्तशुद्धिसाठीं करिती कर्मैं समस्त ह्या महित ॥ ११ ॥**

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।
अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥

---

१ मनःसंयमी. २ पवित्र मनाचा. ३ योगामध्यें. ४ अनासक्तता. ५ जेवतांना. ६ निराळा. ७ पान.

टाकुनि कर्मफलातें योगीही शांति पावतो शुद्ध ।
इच्छा धरूनि कामीं फललोभें होतसे सदा बद्ध ॥ १२ ॥

सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

संन्यासी स्वमनानें कर्में सारीं करूनियां बरवीं ।
देहनवद्वारपुरीं[1] राहे कांहीं करी न तो करवी ॥ १३ ॥

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

कर्तृत्व कर्म करणें जीवांचें हें न ईश्वरी कृत्य ।
कर्माचें फल न तसें चाले संसारचक्र हें नित्य ॥ १४ ॥

नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥

पुण्य न घे कोणाचें कोणाचें ईश घेइना मंतू[2] ।
अज्ञानें ज्ञान बुजे पडती मोहांत त्यामुळें जंतू[3] ॥ १५ ॥

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥

जें ज्ञान बुद्धिच्याही अज्ञानाची लयास ने[4] रास ।
सूर्यासम तेंच पुढें दावी प्रगटूनि आत्मरूपास ॥ १६ ॥

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

तन्निष्ठ तत्परायण अर्पी मनबुद्धि ईश्वरीं सारीं ।
पुनरावृत्ति न पावे ज्ञानानें सर्व किल्बिषें[5] वारी[6] ॥ १७ ॥

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥

विद्याविनयी[7] ब्राह्मण गज धेनु श्वानभक्षिती[8] सृष्टी ।
श्वानादि ह्या समस्तीं ठेविति पंडित सदैव समदृष्टी ॥ १८ ॥

१ देहरूप नऊ दरवाजांच्या नगरांत. २ पाप. ३ प्राणी. ४ नेतें. ५ पातकें. ६ नाश करतो. ७ विद्येनें विनयसंपन्न झालेला. ८ कुत्रीं खाणारे. चांडालादिक.

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥

**साम्यीं[1] स्थिर मन ज्यांचें जिंकिति ते हा जिताच[2] संसार ।**
**सम निर्दोष ब्रह्महि ह्मणुनी ब्रह्मासि ते समाकार ॥ १९ ॥**

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥

**प्रिय होतां हर्षेना अप्रिय होतां न घाबरे धीर[3] ।**
**स्थिरबुद्धि मूढ नोहे ब्रह्मीं ब्रह्मामधें असे स्थीर ॥ २० ॥**

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥

**बाह्यसुखा लुब्ध नसे घेई आत्मस्वरूपसुख योगी ।**
**तो युक्तचित्त ऐसा ब्रह्मामाजीं अखंड सुख भोगी ॥ २१ ॥**

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।
आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥

**जे भोगिति विषयसुखें ते दुःखानेंच सर्वदा श्रमती ।**
**उद्भव नाश तयांना[4] पंडित पार्था! न त्यामधें रमती ॥ २२ ॥**

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

**असुनि जिता सोसाया कामक्रोधादि वेग जो शक्त ।**
**मरणापूर्वींच सारे, जाणावा पुरुष तो सुखी युक्त ॥ २३ ॥**

योऽतःसुखोऽतरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

**आंत सुखी आंत रमे अंतर्ज्योति[5] स्वयें असें जाण ।**
**ब्रह्मचि योगी होउनि पावे तो ब्रह्मरूप निर्वाण ॥ २४ ॥**

लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

---

१ समदृष्टींत. २ जिवंतपणींच. ३ धैर्यवान्. ४ त्या विषयसुखांना. ५ स्वप्रकाशित.

निर्वाणब्रह्मातें पावति ऋषिवर्य पातकक्षीण[1] ।
छिन्नद्वैत[2] यतात्मे[3] भूतांच्या सुख न ज्यां हितावीण ॥ २५ ॥

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥

कामक्रोध न ज्यांना दृढयत्नी जे मनोजयें युक्त ।
तत्तनु जावो राहो असती आत्मज्ञ ते सदा मुक्त ॥ २६ ॥

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥

बाह्य विषय बाहेरी दृष्टी भृकुटींत ठेवुनी राहे ।
प्राणापाना करुनी सम सम जो त्यांस नासिकीं वाहे ॥ २७ ॥

यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥

बुद्धींद्रिय मन जिंकुनि तत्पर मोक्षासि जो सदैव मुनी ।
मुक्तचि सदा असे तो भय किंवा क्रोध कामही दमुनी ॥२८॥

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥

भोक्ता यज्ञतपाचा लोकेश्वर मीच ही नसे भ्रांती ।
भूतांचा सुहृदहि मी ऐसा मज जाणतां मिळे शांती ॥ २९ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णा-ऽर्जुनसंवादे कर्मसंन्यासयोगो नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

**पांचवा अध्याय समाप्त.**

---

१ निष्पाप. २ भेदाभेदरहित. ३ स्थिरबुद्धि.

## अध्याय ६ वा.

**श्रीभगवानुवाच ।**

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।
स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥

**श्रीभगवान्—**

**कर्म करी सकल परी ज्यास फलेच्छा मनांत कांहीं न ।**
**संन्यासी योगी तो न निरग्नी[1] कीं नव्हे क्रियाहीन[2] ॥ १ ॥**

यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।
न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

**संन्यास ज्यास ह्मणती तो तरि तूं समज एक योग असे ।**
**संकल्पन्यासाविण योग कुणाला कधींच साध्य नसे ॥ २ ॥**

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।
योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

**योगाभ्यासी मुनिला कारण हें कर्म ही नसे भ्रांती ।**
**योगारूढासहि[3] त्या कारण ह्मणतात होतसे शांती ॥ ३ ॥**

यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।
सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

**कर्मीं आसक्त नसे विषयांच्या लुब्धही नसे भोगीं ।**
**संकल्प सर्व टाकी आरूढ[4] बा! तोच होतसे योगीं ॥ ४ ॥**

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

**निजचित्त उद्धरावें चित्ताला भवजलीं न बुडवावें ।**
**निजचित्त बंधु अपुलें कीं अपुलें शत्रु तेंच समजावें ॥ ५ ॥**

बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

**जिंकावें मन तेव्हां मित्रासम होय तेंच हितकर्तें ।**
**जरि जिंकिलें न त्याला तरि मनही तेंच शत्रुसम वर्ते ॥ ६ ॥**

१ ज्यानें अग्नि—गृहस्थाश्रम सोडला. २ कर्में टाकलीं. ३ योग साध्य झालेल्यास. ४ पूर्ण.

**अर्जुन उवाच ।**

जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥

**अर्जुन–**

**जितचित्त शांत बहु जे त्यांचें स्थिर चित्त थोर बहु समजें ।**
**मानीं अपमानीं कीं सुखदुःखीं शीत उष्णिंही सम जें ॥ ७ ॥**

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।
युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥

**जो कूटस्थ[1] जितेंद्रिय विज्ञानज्ञानतृप्तिला भोगी ।**
**भेंडा धोंडा सोनें सम ज्या तो युक्त बोलती योगी ॥ ८ ॥**

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

**शत्रू मित्र तिऱ्हाइत बंधू कीं साधु पातकी घोर ।**
**द्वेषी मध्यस्थ अशा सर्वी समबुद्धि तो जगीं थोर ॥ ९ ॥**

योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।
एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

**नियमुनि तनु मन योगी टाकुनि आशा परिग्रहा[2] आधीं ।**
**चित्ताची एकांतीं राहुनि एकाग्रता सदा साधी ॥ १० ॥**

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥

**पाहुनि पवित्र जागा आसन जो अढळ आपुलें घाली ।**
**बहु नीच न उच्च बहू चर्मावरि वसन दर्भ त्या खालीं ॥ ११ ॥**

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।
उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥

**चित्ताच्या शुद्धीस्तव नियमुनि चित्तेंद्रियक्रिया साग्रें[3] ।**
**बैसोनि आसनावरि योग करावा धरूनि एकाग्र ॥ १२ ॥**

१ अविकृत. २ दान. ३ संपूर्ण.

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥

अढळ स्थिर ठेवोनी मानेला तनुस मस्तकालाही ।
नासाग्रीं दृष्टि बरी लावुनि पाहूं नये दुजें कांहीं ॥ १३ ॥

प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

निर्भय शांत मनाचा व्रत जो कां ब्रह्मचर्य पाळितसे ।
मन लावुनि मद्रूपीं मत्पर होवोनि तो सुखांत वसे ॥ १४ ॥

युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।
शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥

अवरुनि मनास लावी योगाभ्यासांत जो सदा योगी ।
मोक्षाला साधन जी ऐशी शांती सदैव तो भोगी[१] ॥ १५ ॥

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥

बहु भक्षुनी न साधे एकांतीं त्यजुनि योग आहार ।
न मिळे बहू निजोनी साधेना योग जागुनी फार ॥ १६ ॥

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

जागे निजे क्रियाही करितो ज्याचा विहार आहार ।
युक्तचि[२] साधे त्याला करणारा योग दुःखपरिहार[३] ॥ १७ ॥

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥

जैं चित्त आत्मरूपीं योजियलेलें असेल संरुद्ध[४] ।
कामीं निस्पृह साऱ्या ह्मणती तेव्हांच त्याजला सिद्ध ॥ १८ ॥

यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥

---

१ अनुभवितो. २ प्रमाणांत. ३ दुःखाचा नाश करणारा. ४ कोंडलेलें.

निर्वात स्थानींच्या शोभे ती अचल दीप उपमा जी।
योग्याच्या चित्ताला योजी जें दमुनि आत्मयामाजी[1] ॥ १९ ॥

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया।
यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥

योगीं निरोधिलेलें मन जेथें सर्वथैव उपरमतें[2]।
जेथें पाहुनि आत्मा मनही त्याच्यामधें सदा रमतें ॥ २० ॥

सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम्।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥

तेथें अनंत सुख जें तें बुद्धिग्राह्य[3] इंद्रियांपरतें[4]।
स्थित होय जाणुनी जो तो स्थितिपासुनि कधीं न या परते[5] २१

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥

तें सुख मिळतां दुसरा मानीना लाभ त्याहुनी थोर।
असतां सुखामधें त्या न चळे जरि दुःख पातलें घोर ॥ २२ ॥

तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम्।
स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

योग तया म्हणति जया दुःखाचा नच वियोग संयोग।
जाणूनी शुद्धमनें साधावा तोच निश्चयें योग ॥ २३ ॥

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः।
मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥

संकल्पें उठती जे सोडुनियां ते समस्तही काम[6]।
दंडुनि मनेंचि अपुल्या सर्वी सर्वत्र इंद्रियग्राम[7] ॥ २४ ॥

शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥

बुद्धि स्थीर कराया धैर्यें व्हावें हळू हळू पात्र[8]।
मन योजुनी स्वरूपीं दुसरें चिंतू नयेच अणुमात्र[9] ॥ २५ ॥

---

१ आत्म्यामध्यें. २ स्थिर होतें. ३ बुद्धीनेंच ग्रहण करण्यासारखें. ४ इंद्रियातीत. ५ माघारा फिरत नाहीं. ६ इच्छा. ७ इंद्रियसमुदाय. ८ योग्य. ९ दुसरें कांहींही.

यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

**मन हें चंचल अस्थिर जिकडे जिकडे पुन्हा पुन्हा धावे ।**
**तेथुनि तेथुनि काढुनि वळवुनि आत्म्यांत त्यास बांधावें ॥२६**

प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥

**मुक्त रजापासुनियां शांतमनें दुष्कृतें न जो व्याप्त ।**
**ब्रह्मस्वरूप योगी उत्तम सुख होतसे तया प्राप्त ॥ २७ ॥**

युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।
सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥

**निर्दोष राहुनी या ठेवी जो स्ववश मानसा योगी ।**
**तो ब्रह्मानुभवानें सहजीं अत्यंत थोर सुख भोगी ॥ २८ ॥**

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥

**आत्मा सर्वांभूतीं भूतें आत्म्यांत सर्व संयुक्त ।**
**पाहे समदृष्टि जगा यन्मत योगामधें सदा युक्त ॥ २९ ॥**

यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

**सर्व ठिकाणीं मजला पाहे मजमाजि सर्व लोकांस ।**
**मी त्याचा तो माझा न विसंबूं कधिंहि एकमेकांस ॥ ३० ॥**

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

**आहे सर्वांभूतीं एकच मी जाणुनी भजेल मज ।**
**योगी तरुनि भवीं तो राहे मजमाजि सर्वथा समज ॥ ३१ ॥**

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥

---

१ रजोगुणापासून, व्यापापासून. २ पातकानें. ३ मनाला. ४ एकरूप. ५ ज्याचें मन.

अपुल्या समान सारे मानी जो अर्जुना! कधीं नान्य[1]।
निजसम[2] सुखदुःखेंही योगी अत्यंत तो मला मान्य ॥ ३२ ॥

अर्जुन उवाच ।

योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।
एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिरां ॥ ३३ ॥

अर्जुन—

साम्येंकरून हा जो कथिला त्वां योग आज विश्वपते ! ।
परि त्याची स्थिति टिकणें चांचल्यें कठिण फार मज गमते ३३

चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

कीं मन चंचल कृष्णा! इंद्रियगण[3] ओढितें बळें सारा ।
तन्निग्रह दुष्कर बहु वाटे मज बांधणें जसा वारा[4] ॥ ३४ ॥

श्रीभगवानुवाच ।

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

श्रीभगवान्—

आहे खरेंच विजया! चंचल तैसें अजिंक्य मन बा! हें ।
अभ्यासें वैराग्यें परि तेंही स्ववश होउनी राहे ॥ ३५ ॥

असंयतात्मनो योगो दुष्प्राप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

मन नावरे तयाला मज वाटे योगही न साधेल ।
जिंकुनि मन अभ्यासीं यत्न करी त्यास योग लाधेल[5] ॥ ३६ ॥

अर्जुन उवाच ।

अयतिः श्रद्धयोपेतो योगाचलितमानसः ।
अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥

---

१ दुसरें असें ह्मणतच नाहीं. २ समदृष्टीनें. ३ इंद्रियसमुदाय. ४ वायु.
५ प्राप्त होईल.

अर्जुन–

श्रद्धाळू अयतीचें[1] योगांतुनि मन जरी चळे जगतीं ।
सिद्धि न घडतां योगीं कृष्णा! मिळते तयास कोण गती?॥

कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥

अपुरा राहुन कृष्णा! ब्रह्मपंथीं[2] जो भुलोनियां जाय ।
मुकुनी दोहींला तो छिन्नाभ्रापरि[3] विरल कीं काय? ॥ ३८ ॥

एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

निःशेष संशया या श्रीकृष्णा! छेदणार तूंच भला ।
ऐसा संशयहर्ता तुजविण कोणी दिसे न अन्य मला ॥ ३९ ॥

श्रीभगवानुवाच ।

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

श्रीभगवान्–

त्याचा नाश न येथें परलोकींही न अर्जुना! कथिला ।
श्रेयस्कर मार्गी या बापा! कोणी न जाय दुर्गतिला ॥ ४० ॥

प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

पावोनि पुण्यलोकां भोगुनि बहुकाल भोग जें इष्ट ।
शुद्ध श्रीमंतांच्या जन्मे सदनांत योगविभ्रष्ट ॥ ४१ ॥

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥

अथवा योग्यांच्या कीं विद्वानांच्या कुलांत जन्मे तो ।
भाग्यानें थोड्यासचि ह्या लोकीं जन्मही असा येतो ॥ ४२ ॥

---

१ अभ्यास होत नाहीं, निग्रह करवत नाहीं, त्याचें. २ ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत.
३ वितळलेल्या मेघाप्रमाणें.

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥

**त्या देहांतहि लाभे त्याला तो योग पूर्व[1]बुद्धीचा ।**
**ते[2]थेंही तो करितो कौंतेया! यत्न योगसिद्धीचा ॥ ४३ ॥**

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

**पूर्वाभ्यास तयाच्या कडुनी [3]नवयोग [4]मागुता [5]मांडी ।**
**योगेच्छु पूर्विं[6]चा तरि शब्दब्रह्मादि[7]कांसि [8]ओलांडी ॥ ४४ ॥**

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥

**अभ्यासितां प्रयत्नें योग पुढें किल्बि[9]षें न तीं तगती ।**
**होउनि अनेक जन्मीं सिद्ध[10] पुढें प्राप्त होय दिव्यगती ॥ ४५ ॥**

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥

**थोर तप्यांहुनि योगी ज्ञान्यांहुनि फार [11]मान तो भोगी ।**
**[12]कर्म्यांहुनि अधिकचि तो ह्यास्तव तूं होय अर्जुना! योगी ॥ ४६**

योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।
श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥

**सर्वहि योग्यांत परी मद्रूपीं चित्त चिंतिना अन्य ।**
**भक्तीनें मज भजतो श्रेष्ठ महा युक्त तोच मज मान्य ॥ ४७ ॥**

इति श्रीमद्भगव० आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

**सहावा अध्याय समाप्त.**

---

१ पूर्वजन्मींच्या बुद्धीचा. २ त्या दुसऱ्या जन्मांतही. ३ नवा योग. ४ पुन्हा. ५ सुरू करतो. ६ पूर्वजन्मींचा. ७ वेदांना सुद्धां. ८ पलीकडे जातो. ९ पातकें. १० पूर्ण. ११ मान्यता. १२ कर्मठांपेक्षांही.

# अध्याय ७ वा.

**श्रीभगवानुवाच ।**

मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः ।
असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥

**श्रीभगवान्–**

**मन्निष्ठ[1] चित्त करुनी माझा आश्रय धरूनि योगातें ।**
**निःसंशय पूर्णपणें जाणसि मज कें वि आयके बा! तें ॥ १ ॥**

ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।
यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥

**विज्ञानांसह[2] आतां ज्ञान तुला सर्व सांगतों पाहीं ।**
**तें जाणतां जगीं मग जाणायाचें उरेचना कांहीं ॥ २ ॥**

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥

**विरळा मनुज सहस्रीं यत्चित्तीं यत्नसिद्धिही बाणे[3] ।**
**सिद्धींच्या यत्न्यांतहि विरळा जो तत्त्वता[4] मला जाणे ॥ ३ ॥**

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥

**भू जल तेज समीरण[5] मन कीं आकाश हें अविछिन्न[6] ।**
**बुद्धि अहंकार अशी मम माया अष्टधा असे भिन्न ॥ ४ ॥**

अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

**अपरा ही तों ऐशी प्रकृति असे आणखी परा मम ही ।**
**जीवस्वरूप होउनि पार्था! धरिते समस्त तीच मही ॥ ५ ॥**

---

१ माझ्या निष्ठेनें युक्त. २ व्यवहारज्ञानासुद्धां. ३ बिंबते. ४ खऱ्या स्वरूपानें. ५ वायु. ६ संपूर्ण.

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

**प्राणी हिच्याच पासुनि होती हे सकल जाण निर्धार ।**
**तरिही सर्व जगाच्या नाशोत्पत्तीस मीच आधार[1] ॥ ६ ॥**

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

**माझ्या शिवाय दुसरें नाहीं कोठेंच अर्जुना! कांहीं ।**
**माझ्यांत ओविलें हें सर्वहि सूत्रीं मणी जसे पाहीं ॥ ७ ॥**

रसोऽहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥

**उदकामाजी रस[2] मी पार्था! मी दीव्यतेज रविसोमीं[3] ।**
**वेदीं प्रणव[4], पराक्रम पुरुषीं मी शब्द मी असे व्योमीं[5] ॥ ८ ॥**

पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥

**पृथ्वींत पुण्यगंधहि[6] होउनि मी अग्निमाजि तेज वसें ।**
**तप तापसांत तें मी जीवन भूतांत तेंहि मीच असें ॥ ९ ॥**

बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥

**शाश्वत बीज असें मी पार्था! ह्या सर्व जाण भूतांत[7] ।**
**मी तेजसांत तेजहि बुद्धि असे मीच बुद्धिमंतांत ॥ १० ॥**

बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

**कामानुरागवर्जित[8] बलवंतीं मीच शक्ति बल नाम ।**
**धर्माच्या उलट नसे भूतीं[9] तो मीच अर्जुना! काम[10] ॥ ११ ॥**

ये चैव सात्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥

---

१ आश्रय. २ पातळ पदार्थ. ३ चंद्रसूर्यांमध्यें. ४ ओंकार. ५ आकाशामध्यें. ६ सुवास. ७ प्राण्यांमध्यें. ८ इच्छाप्रेमरहित. ९ प्राण्यांमध्यें. १० इच्छा.

सात्विक राजस तामस माझ्यापासूनि भाव[1] हे तीन।
जाण मदाधीनचि[2] ते त्यांच्या परि मी कधीं न आधीन[3] ॥१२॥

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत्।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

त्रिगुणात्मक भावचि हे मोहिति ह्या जाण सर्व विश्वाशीं।
तेणें नेणे कोणी मज कीं मी भिन्न आणि अविनाशी ॥ १३ ॥

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।
मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥

ऐशी गुणमय दैवी माझी दुस्तर तरावया माया।
होती पात्र जगीं जे भजती मज ते तरून ही जाया ॥ १४ ॥

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः।
माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥

दुष्कृति मूढ नराधम भजती लोकीं कधीं न जे मातें।
करि नष्ट बुद्धि माया पावति ते राक्षशी स्वभावातें ॥ १५ ॥

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

भजती लोक चतुर्विध[4] सुकृति[5] मला अर्जुना! जगीं जाण।
अर्थार्थी[6] जिज्ञासू[7] ज्ञानी कीं आर्त[8] हें मनीं आण ॥ १६ ॥

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥

ज्ञानी श्रेष्ठ तयांतिल युक्त मला नित्य एकनिष्ठ भजे।
प्रिय अत्यंत मला तो त्याला प्रियही तसाच मी समजें ॥ १७

उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम्।
आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥

सारे उदार तरि हे ज्ञानी माझा गमे मला प्राण।
कीं युक्तचित्त मज तो सद्गति मानूनियां भजे जाण ॥ १८ ॥

---

१ विकार. २ माझ्या स्वाधीन. ३ स्वाधीन. ४ चार प्रकारचे. ५ पुण्यवान्. ६ द्रव्येच्छु. ७ ज्ञानेच्छु. ८ रोगानें पीडित.

बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥

**बहु जन्मांच्या अंतीं ज्ञानी मज वासुदेवमय सारें ।**
**मानुनि भजे महात्मा दुर्लभ ऐसा जगामधें बा रे! ॥ १९ ॥**

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥

**इच्छा विचार नेती तैसे तैसेच देवता हीनें[1] ।**
**तत्तद्विधिनें भजती मायेच्या जे सदैव आधीनें[2] ॥ २० ॥**

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥

**जो जो ज्या ज्या देवा पूजूं इच्छी, धरूनि भक्तिबळ ।**
**त्या त्या रूपांमाजी[3] श्रद्धा मी त्यास देतसें अढळ ॥ २१ ॥**

स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।
लभते च ततः कामान्मयैव विहितान्हितान् ॥ २२ ॥

**त्या श्रद्धेनें तन्मन त्या त्या आराधनेकडे[4] वळतें ।**
**त्यांच्यापासुनि इच्छित मिळतें जें मीच निर्मितों फळ तें ॥**

अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥

**होतीं अल्पमतीला सर्व फळें नाशिवंत तीं समज ।**
**देवार्चक[5] देवांना पावति, मद्भक्त पावतात मज ॥ २३ ॥**

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः ।
परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥

**मी तों अमूर्त[6] असतां मानिति हे मूर्तिमंत मज मूढ ।**
**कीं तें स्वरूप माझें उत्तम अव्यक्त[7] नेणती गूढ ॥ २४ ॥**

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥

---

१ क्षुद्र. २ स्वाधीन. ३ मूर्तींमध्यें. ४ उपासनेकडे. ५ इतर देवतांची उपासना करणारे. ६ निराकार. ७ अदृश्य.

**सर्वांना न दिसें मी टाकी झांकून योगमाया[1] ही ।**
**अज[2] मी अव्यय[3] ऐसें मूढ जनांना कळे न हें कांहीं ॥ २५ ॥**

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।
भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥

**जाणें मी गेलेलीं भूतें कीं असति अर्जुना! त्यांतें ।**
**होणारींही जाणें मी, परि कोणीच नेणती मातें ॥ २६ ॥**

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ २७ ॥

**रागद्वेषांपासुनि[4] पार्था! द्वंद्वें[5] जगामधें घडती ।**
**तेणें मोहामाजी भूतें[6] हीं जन्मतांच सांपडती ॥ २७ ॥**

येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ २८ ॥

**झाडूनि सर्व पापें दवडिति जे फार पुण्यवंत जन ।**
**ते द्वंद्वमोह[7] टाकुनि करिती माझें दृढव्रती[8] भजन ॥ २८ ॥**

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।
ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥

**वाराया[9] मोक्ष जरा[10] झटती जे कां मदाश्रयें बा! रे! ।**
**ते ब्रह्म जाणुनीयां जाणति अध्यात्म कर्मही सारें ॥ २९ ॥**

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।
प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

**मी साधिभूत[11] तैसा आहें कीं साधिदैव[12] मी समज ।**
**मी साधियज्ञ[13] अंतीं स्मरती जे तेच जाणतात मज ॥ ३० ॥**

इति श्रीमद्भगव० ज्ञानविज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

**सातवा अध्याय समाप्त.**

---

१ प्रकृति. २ जन्मरहित. ३ अक्षय. ४ प्रीति आणि द्वेष ह्यांपासून. ५ दोन दोन भेद. ६ प्राणी, जीव. ७ भिन्नभाव. ८ कडकडीत नियम पाळणारे. ९ नाश करण्यासाठीं. १० वार्धक्य. ११ अधिभूतासह. १२ अधिदैवासह. १३ अधियज्ञासह.

# अध्याय ८ वा.

## अर्जुन उवाच।

किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम।
अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥

## अर्जुन–

**अध्यात्म ब्रह्म कसें? किंवा पुरुषोत्तमा! कसें कर्म।**
**अधिदेव तें कसें? हो! अधिभूतांतील कोणतें मर्म? ॥ १ ॥**

अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन।
प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥

**अधियज्ञ कोण? देवा! कैसा देहीं[1] मनांत आणावा।**
**कैसा प्रयाणकालीं[2] जितचित्तें[3] तुज समग्र[4] जाणावा? ॥ २ ॥**

## श्रीभगवानुवाच।

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते।
भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

## श्रीभगवान्–

**परम ब्रह्म अक्षर बोलति अध्यात्म हें स्वभावातें।**
**जें भूतभाव निर्मी कृत्य जगीं कर्म बोलती त्यातें ॥ ३ ॥**

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम्।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

**अधिभूत क्षर तनु जें अधियज्ञें पुरुष बोलती लोकीं।**
**अधियज्ञ मीच देहीं राहुनि पाळीं तयास अवलोकीं ॥ ४ ॥**

अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

**मातेंचि अंतकालीं स्मरतां सोडोनि जाय जो देह।**
**तो मत्स्वरूप पावे नाहीं तिळमात्र ह्यांत संदेह ॥ ५ ॥**

---

१ देहामध्यें. २ अंतसमयीं. ३ मनोजयकर्त्यानें. ४ परिपूर्ण रीतीनें.

यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।
तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥

**ज्या ज्या रूपा दुसऱ्या स्मरुनी टाकीत आपुला काय ।**
**तें तें स्वरूप पावे पार्था! रंगूनि ज्यांत तो जाय ॥ ६ ॥**

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥

**ह्या कारणें मला तूं स्मरुनि सदासर्वदा करीं युद्ध ।**
**मन बुद्धि अर्पितां मज होशिल माझें स्वरूप तूं शुद्ध ॥ ७ ॥**

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥

**अभ्यासयोग करुनी दवडी कोठें न अन्य[1] चित्तातें ।**
**चिंतन करतां पार्था! पावे तो परम दिव्यपुरुषातें[2] ॥ ८ ॥**

कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥

**कवि[3] फलदाता[4] शास्ता[5] सूक्ष्माहुनि सूक्ष्म[6] जो तमापरता[7] ।**
**सूर्यासमान सुप्रभ[8] नित्य सनातन अचिंत्य तो स्मरता ॥ ९ ॥**

प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥

**जो कां प्रयाणकालीं[9] अढळ मनें योगयुक्तिनें भावें ।**
**भ्रुकुटीमाजी[10] प्राणा रोधी[11] पुरुषास दिव्य तो पावे ॥ १० ॥**

यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

**अक्षर ह्मणती वैदिक[12] शिरती ज्याच्यांत साधु बैरागी ।**
**जें ब्रह्मचर्य इच्छी संक्षेपें कथिन त्या पदालागीं[13] ॥ ११ ॥**

---

१ दुसरीकडे. २ परमात्म्याला. ३ सर्वज्ञ. ४ फलद्रूप होणारा. ५ शासनकर्ता. ६ लहान. ७ अज्ञानाहून भिन्न. ८ तेजस्वी. ९ अंतकालीं. १० भोंवयांमध्यें. ११ आवरून धरतो. १२ वेदशास्त्रज्ञ. १३ स्थानाला.

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥

**द्वारें[1] कोंडुनि सगळीं मनही हृदयांत कोंडुनी धरणें ।**
**ब्रह्मांडीं प्राण बरा रोधोनी[2] योगधारणा करणें ॥ १२ ॥**

ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

**प्रणवब्रह्मा[3] जपतां एकाक्षर जो स्मरोनियां मातें ।**
**सोडोनि देह ज्ञातो उत्तम गति सर्वदा मिळे त्यातें ॥ १३ ॥**

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥

**बहु एकनिष्ठ चित्तें स्मरतो मजला धरूनि एकोपा[4] ।**
**जो नित्ययुक्त योगी त्याला पार्था! सदैव मी सोपा ॥ १४ ॥**

मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।
नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥

**मज पावती महात्मे सिद्धी सद्गति मिळून जे पाहीं ।**
**त्यांना दुःखालय हा क्षणिक असा जन्मही पुन्हा नाहीं ॥१५॥**

आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

**आब्रह्मभुवन[5] लोकां[6] ह्या पुनरावृत्तिची असे पाळी ।**
**परि पावे मज त्याला फिरुनि न ये जन्म हा कदाकाळीं ॥१६॥**

सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।
रात्रिं युगसहस्रां तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

**दशशत युगें जगाचीं ब्रह्याचा दिवस बोलती त्याला ।**
**रात्रहि तितुकी आहे विदित अहोरात्र कालवेत्त्याला[7] ॥ १७॥**

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे ।
रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥

---

१ इंद्रियें. २ आवरून धरून. ३ ओंकाररूप परब्रह्माला. ४ ऐक्यभाव. ५ ह्या लोकापासून ब्रह्मलोकांपर्यंत. ६ सर्व लोकांमध्यें. ७ कालगणना करणाऱ्यांना.

येतां दिवस विधीचा[1] अव्यक्तांतूनि[2] सर्वही व्यक्ती[3] ।
होउनि रात्र्यारंभीं लोपुनि जातात सर्व अव्यक्तीं ॥ १८ ॥

भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

ही जीवसृष्टि ह्यापरि होते जाते पुनःपुन्हा नष्ट ।
रात्र्यारंभीं लोपे पुनरपि दिवसास होतसे[4] स्पष्ट ॥ १९ ॥

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तो व्यक्तात्सनातनः ।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥

परि भूतांप्रकृतीहुनि[5] पुरुष[6] निराळा अनादि एक असे ।
गेलीं समग्र भूतें[7] विलया तरिही तयास नाश नसे ॥ २० ॥

अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥

अक्षर अव्यक्त असें ह्मणती त्यालाच सद्गती नाम ।
जें पावतां न येती माघारे श्रेष्ठ तेंच मम धाम[8] ॥ २१ ॥

पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥

तो श्रेष्ठ पुरुष पार्था! लाभे अद्वैतभक्तिनें[9] खास ।
ज्याच्यांत सर्व भूतें व्यापी जो ह्या समस्त विश्वास ॥ २२ ॥

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।
प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥

योग्याची तनु पडतां न घडे कीं जन्म हा घडे फिरुनी ।
ते ते कालहि पार्था! कथितों तुजला यथाक्रमेंकरुनी ॥२३॥

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।
तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

अग्नि[10] ज्योती[11] दिनें[12] सितें[13] पक्ष सहा उत्तरायणीं मास ।
असतां शरीर टाकी ब्रह्मीं ब्रह्मज्ञ तो करी वास[14] ॥ २४ ॥

---

१ ब्रह्मदेवाचा. २ निराकारापासून. ३ प्राणिमात्र. ४ व्यक्त, दृश्यमान. ५ जीवांहून आणि मायेहूनही. ६ आत्मा. ७ प्राणी. ८ स्थान. ९ अनन्य भावानें. १० शुद्धी असून. ११ बोलत असून. १२ दिवस. १३ शुक्ल. १४ राहतो.

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।
तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

**धूम निशा[2] पक्ष असित[3] त्यांत सहा दक्षिणायनीं मास ।**
**चंद्रामृत मार्गी ये जाउनि योगी फिरून जन्मास ॥ २५ ॥**

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।
एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥ २६ ॥

**ऐशा शाश्वत संमत असती ह्या शुक्ल कृष्ण गति लोकीं ।**
**एकीनें जन्म न ये दुसरीनें ये फिरूनि अवलोकीं ॥ २६ ॥**

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।
तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥

**हे दोन मार्ग जाणुनि योगी मोहामधें पडे न कदा ।**
**ह्या कारणेंचि ह्मणतों पार्था! हो योगयुक्त तूंहि सदा ॥ २७॥**

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥

**[4]वेदीं य[5]ज्ञीं दा[6]नीं कीं पुण्य तपांत जें असे साध्य ।**
**जाणुनि उल्लंघुनि तें योगी चढतो परंपरा आद्य ॥ २८ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीता योगशास्त्रेऽक्षरब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

**आठवा अध्याय समाप्त.**

---

१ शुद्धींत नसतां. २ रात्र. ३ कृष्ण. ४ वेदामध्यें. ५ यज्ञामध्यें. ६ दानामध्यें.

# अध्याय ९ वा.

## श्रीभगवानुवाच ।

इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।
ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥

## श्रीभगवान्—

**गुह्यांतिल गुह्य असें कथितों कीं तूं विशुद्धमतियुक्त[1] ।**
**विज्ञान[2] ज्ञानासह जाणुनि होशील तूंहि भवमुक्त[3] ॥ १ ॥**

राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।
प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥

**हें राजगुह्य उत्तम निर्मल बहु धर्म्य राजविद्या ही ।**
**प्रत्यक्ष अनुभवा ये अव्यय[4] सुखसाध्य[5] जी सदा पाही ॥ २ ॥**

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

**ज्या पुरुषांची श्रद्धा पार्था! धर्मावरूनि ह्या आटे[6] ।**
**मजला प्राप्त न होतां भ्रमती ते जन्ममृत्युच्या वांटे[7] ॥ ३ ॥**

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥

**अव्यक्त[8] मूर्तिनें मी सारें हें विश्व गोविलें आहे ।**
**माझ्यांत सर्व भूतें भूतांमाजी कधीं न मी राहें ॥ ४ ॥**

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

**माझ्यांत न भूतेंही मद्योगैश्वर्य[9] हें करी मनन ।**
**भूतीं नसोनि भूतें धरितों[10], देतों तयास मी जनन[11] ॥ ५ ॥**

---

१ पवित्रमनाचा. २ ज्ञान व व्यवहार यांसह. ३ संसारमुक्त. ४ सनातन. ५ सहज मिळण्यासारखें. ६ नाहींशी होते. ७ मार्गानें. ८ निराकार. ९ माझें योग-सामर्थ्य. १० वागवितों. ११ जन्म.

यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

**बहु थोर सर्वगामी[1] नित्य नभीं[2] राहतो जसा वारा ।**
**माझ्यांत जाण वसतो भूतांचा[3] ग्रामही[4] तसा सारा ॥ ६ ॥**

सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥

**कल्पक्षयांत पार्था ! जाती भूतें समग्र विलयास ।**
**मन्मायेंत, पुन्हा मी कल्पारंभांत निर्मितों त्यास ॥ ७ ॥**

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।
भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥

**निर्मी पुनः पुन्हा मी मायामय हें उभारुनी यंत्र ।**
**हा भूतसंघ[5] सारा प्रकृतिवशें[6] जो सदैव परतंत्र ॥ ८ ॥**

न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।
उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

**कर्मे परंतु पार्था ! करिती मजला कधीं न तीं बद्ध ।**
**कीं मी असक्त कर्मी नित्य उदासीनसा असें शुद्ध ॥ ९ ॥**

मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।
हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥

**मी अध्यक्ष ह्मणोनी, उद्भव माया चराचरा करते ।**
**ह्याकारणेंच विजया ! सारें ब्रह्मांडचक्र हें फिरतें ॥ १० ॥**

अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥

**भूतांचा ईश्वर मी नेणुनि माझें स्वरूप बहु गूढ ।**
**आहे मनुष्यरूपी समजुनि अवमानिती[7] मला मूढ ॥ ११ ॥**

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥

---

१ सर्वत्र संचार करणारा. २ आकाशामध्यें. ३ प्राण्यांचा. ४ समुदायही. ५ प्राणीसमुदाय. ६ मायाधीन असल्यामुळें. ७ अपमान करतात.

**आशा कर्में ज्ञानें मतिमंदाचीं वृथा वृथा असतीं ।**
**दैत्यांचा असुरांचा धरुनी मूढस्वभाव जे बसती ॥ १२ ॥**

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

**दैवीस्वभाव धरुनी पार्था! मज एकनिष्ठ जे भजंते[1] ।**
**जाणुनि अनादि[2] अव्ययें[3] गमति महात्मे खरे खरे मज ते ॥ १३**

सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।
नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥

**मत्कीर्तन करिति सदा करिति महायत्न निश्चयें फार ।**
**भजती अनन्य चित्तें करुनि मला भक्तिनें नमस्कार ॥ १४ ॥**

ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते ।
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥

**ज्ञानाच्या यज्ञानें दुसरे किति लोकही मला यजंती[4] ।**
**द्वैताद्वैतें[5] कोणी मानुनि किति विश्वरूपें[6] मी भजती ॥ १५ ॥**

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।
मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

**क्रतु[7] यज्ञ मी स्वधा[8] मी औषधें[9] मी मीच कीं असें सोम ।**
**घृत मी मंत्रहि मी तो अग्निहि मी मीच कीं असें होम ॥ १६**

पितामहस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥ १७ ॥

**माता पिता जगाचा धाता[10] आजा मलाच कीं नाम ।**
**प्रणवहि[11] पवित्र तो मी वेद्यहि[12] मी मीच ऋग्यजुःसामें[13] ॥ १७ ॥**

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

**गति मीच आप्त पालक साक्षी आश्रय निवास मी स्वामी ।**
**सृष्टिस्थितिलय तो मी ठेवा मी नित्य बीज विश्वा मी ॥ १८ ॥**

---

१ भजणारे. २ सनातन. ३ निर्विकार. ४ यजन करतात. ५ एकत्वेंकरून व पृथक्त्वेंकरून. ६ विश्वस्वरूप. ७ श्रौतयज्ञ. ८ पितृयज्ञ. ९ होमद्रव्य. १० उत्पन्नकर्ता. ११ ओंकारसुद्धां. १२ जाणण्यास योग्य. १३ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद.

तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

**मीच तपें वर्षें मी अति वृष्टी मी करीं अनावृष्टी ।**
**मोक्षहि मी मृत्युहि मी पार्था ! चैतन्य मीच जडसृष्टी ॥१९॥**

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।
ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥

**मज यजुनि सोमपांनी[1] यज्ञें वेदज्ञें[2] शुद्ध सुरलोकें[3] ।**
**प्रार्थुनि[4] पुण्यें जाउनि भोगितिही दिव्य भोग ते लोक ॥ २० ॥**

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥

**स्वर्गा भोगुनि येती सरतां ते पुण्य मृत्युलोकांत ।**
**वेदविधीफळलोलुप[5] पडति असे जन्ममृत्युशोकांत ॥ २१ ॥**

अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

**जे मज अनन्य भावें यजती भजती मदीय अनुषंगें ।**
**मच्चित्त[6] सतत त्यांचा मी योगक्षेम[7] चालवीं अंगें ॥ २२ ॥**

येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

**जे अन्य देवतांना श्रद्धेनें पूजितात भक्तजन ।**
**माझेंच अर्जुना ! जरि होतें विधिहीन तें तरी भजन ॥ २३ ॥**

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।
न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंति ते ॥ २४ ॥

**यज्ञांचा सकलहि मी भोक्ता स्वामी करीं तयां जतन ।**
**सत्य स्वरूप माझें नेणति ह्मणुनी तयां घडे पतन[8] ॥ २४ ॥**

---

१ सोमरस-पिणारे, याज्ञिक. २ वेद जाणणारे. ३ स्वर्गलोक. ४ प्रार्थना करून. ५ वेदांतील विधीच्या फळास लुब्ध झालेले. ६ माझ्याच ठायीं चित्त ठेवणारे. ७ इच्छापूर्ण करतो. ८ अधोगति.

यांति देवव्रता देवान् पितॄन्यांति पितृव्रताः ।
भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥

**देवार्चक देवांना पितृव्रत पावतात पितरांतें ।**
**भूतार्चक भूतांतें माझे ते भक्त पावती मातें ॥ २५ ॥**

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

**भक्तीनें मज देवो कोणीही पत्र पुष्प फल पाणी ।**
**तें मी प्रेमें भक्षीं जाणुनि तो शुद्धबुद्धिची खाणी ॥ २६ ॥**

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥

**जें जें करिशी खाशी करिशिल तप होमिशील बापारे ! ।**
**कीं दानधर्म पार्था ! अर्पण करिं तूं मलाच तें सारें ॥ २७ ॥**

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।
संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

**येणें शुभाशुभांतुनि सुटुनि तुझा कर्मबंध मोडेल ।**
**संन्यास योग साधुनि मज पावुनि मुक्तिसौख्य जोडेल ॥२८॥**

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥

**सर्वांभूतीं सम मी कोणी मज शत्रु मित्रही नसती ।**
**भक्तीनें भजती जे तन्मनिं मी मन्मनांत ते वसती ॥ २९ ॥**

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥

**दुष्ट दुराचारीही मजसि भजे जो भजे न अन्यास ।**
**निश्चय दिव्य तयाचा ह्मणुनी साधूच मान तूं त्यास ॥ ३० ॥**

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।
कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥

---

१ देवांची भक्ति करणारे. २ जीवांवर भक्ति ठेवणारे. ३ होम करशील. ४ राहतात.

झडकरि धर्मात्मा तो होउनि चिर शांति सेवुनी राही ।
मद्भक्त नच कधींही नाशे पार्था ! मम प्रतिज्ञा ही ॥ ३१ ॥

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्ते पि यांति परां गतिम् ॥ ३२ ॥

मातें भजतां पार्था ! कोणी होवोत पातकी देही[1] ।
हो वैश्य शूद्र महिला[2] उत्तम गति सर्व पावती तेही ॥ ३२ ॥

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥

राजर्षि ब्राह्मण मग भक्त सुकृति[3] मुक्त कां न हें समजें ।
हा मृत्युलोक दुःखद तुज आला ह्मणुनि तूं मलाच भजें॥३३

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

मद्रूपीं मन ठेवीं वंदीं मद्भक्त हो मलाच यजें[4] ।
मजमाजि ठेवितां मन ऐसें, तूं शीघ्र पावशील मज ॥ ३४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीता० राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोध्यायः ॥ ९ ॥

नववा अध्याय समाप्त.

१ प्राणी. २ स्त्रिया. ३ पुण्यवान्. ४ यज्ञ कर, अर्पण कर.

# अध्याय १० वा.

श्रीभगवानुवाच ।

भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।
यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥

श्रीभगवान्—

आतां फिरून पार्था! माझें हें वचन आयकें नामी[1] ।
वाढाया प्रेम तुझें कथितों जें तव हितार्थ तुजला मी ॥ १ ॥

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।
अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥

माझा प्रभाव ठाउक देवांना कीं महर्षिनाहि नसे ।
बा! सर्व आदिकारण देवांना कीं ऋषींस मीच असे ॥ २ ॥

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।
असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥

आहें अनादि अज मी लोकमहेश्वर जयास हें कळतें ।
मनुजांत सुज्ञ जन तो त्याचें पातक समस्तही जळतें ॥ ३ ॥

बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।
सुखं दुःखं भवो भावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥

बुद्धि क्षमा खरेपण शम दम कीं ज्ञान मोह नाश महा ।
सुखदुःख नाश उद्भव भय किंवा अभयही तसेंच पहा ॥ ४ ॥

अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।
भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥

समता तुष्टि अहिंसा तप कीर्ति अकीर्ति कीं महादान ।
हे भिन्न भाव[3] भूतीं होती मजपासुनीच तूं मानं[4] ॥ ५ ॥

महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥

---

१ उत्तम. २ समदृष्टी. ३ विकार, गुण. ४ समज.

पूर्वीं मद्भक्त मनें केले सप्तर्षि मीच मनु चारी।
त्यांच्यापासुन पुढती झाली लोकांमधें प्रजा सारी ॥ ६ ॥

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः।
सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥

जो ही विभूति[1] माझी योगहि माझा खरोखरी[2] जाणे।
त्याच्या अंतःकरणीं निःसंशय योगही पुरा बाणे[3] ॥ ७ ॥

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते।
इति मत्वा भजंते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥

सर्वांचा उद्भव मी माझ्यापासून सर्वही चाले।
ऐसें मानुनि भजती सुज्ञ मला पूर्ण भक्तिनें धाले[4] ॥ ८ ॥

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम्।
कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥ ९ ॥

मन जीव अर्पुनी मज बोधिति[5] अन्योन्य जे सदा सुमती।
वर्णन करूनि मातें आनंदें नित्य तोषती रमती ॥ ९ ॥

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम्।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥ १० ॥

ऐसें प्रेमपुरस्कर भजती जे भक्त सर्वदा युक्त।
मज पावतील ऐसा देतों मी बुद्धि[6]योग त्यां उक्त ॥ १० ॥

तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

मी ज्ञानदीपतेजें तद्धृदयांतिल समस्त जड पाश।
करुनी कृपा तयाचें करितों अज्ञानजन्य तम नाश ॥ ११ ॥

अर्जुन उवाच।

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान्।
पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥

---

१ स्वरूप. २ पूर्णपणें. ३ बिंबतो. ४ तृप्त झालेले. ५ चर्चा करतात. ६ ज्ञान.

## अर्जुन–

शाश्वत पवित्र तो तूं तूंचि परब्रह्म तूं परंधाम ।
तूं आदि तूं विभू तूं अज[1] उत्तम पुरुष हें तुझें नाम ॥ १२ ॥

आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥

देवर्षि नारदादिक ऋषि सारे हेंच बोलतात तुला ।
व्यास असित देवलही सांगशि तूंही स्वयें तसेंच मला ॥ १३

सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।
नहि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥

जें जें वदशी कृष्णा! तें तें मज सत्य वाटतें सगळें ।
व्यक्ति[2] तुझी भगवंता! स्पष्ट अशी देवदानवां न कळे ॥ १४ ॥

स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।
भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥

तूं आपणासि आपण जाणशि पुरुषोत्तमा स्वयें मात्र ।
भूतेश देवदेवा! पालक भूतांसि तूं अहोरात्र ॥ १५ ॥

वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।
याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥

झाडुनि विभूति सांगें सर्व तुझ्या हा मनीं असे हेतू ।
ज्या ज्या विभूतिनें तूं व्यापुनिया लोक राहशी बा! तूं ॥१६॥

कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिंतयन् ।
केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥

योगेश्वरा! कसा तूं जाणुनियां उचित चिंतना[3] असशी ।
कोण्या कोण्यारूपीं भगवंता! चिंत्य[4] होउनी वससी[5] ॥ १७ ॥

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

१ अजन्मा. २ स्वरूप. ३ ध्यान करण्याला. ४ चिंतन करण्यास योग्य. ५. राहतोस.

विस्तृत तव योग पुन्हा सांग विभूती जनार्दना! पुन्न ।
तव वचनामृतपानें श्रवण न होती कदापि हे तृप्त ॥ १८ ॥

श्रीभगवानुवाच ।

हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

श्रीभगवान्–

हर्षे आत्मविभूती कथिन ह्मणे दिव्य त्या कृपावंत ।
परि मुख्य मुख्य पार्था! कीं विस्तारास त्या नसे अंत ॥ १९॥

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।
अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥ २० ॥

माझी मुख्य विभूती आत्मा हृदयस्थ सर्व जीवांचा ।
सर्वां भूतांचा मी आदि तसा मध्य अंतही साचा ॥ २० ॥

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥

आदित्यांत असे मी विष्णु तसा तेजसांत मीच रवी ।
मरुतीं मरीचि मी तो नक्षत्रीं मी शशिप्रभा मिरवी ॥ २१ ॥

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
इंद्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

वेदांत साम तो मी मी देवांमाजि इंद्र हें जाण ।
सर्वेंद्रियांत मन मी भूतीं मी चेतना मनीं आण ॥ २२ ॥

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥

रुद्रीं शंकर तो मी राक्षसयक्षांत मीच वैश्रवण ।
पावक वसूंत तो मी मेरू मी पर्वतीं करीं श्रवण ॥ २३ ॥

---

१ स्वरूपें. २ तेजस्वी पदार्थांत. ३ सामवेद. ४ चैतन्य. ५ कुबेर. ६ अग्नि.

पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
सेनानीनामहं स्कंदः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥

**साऱ्या पुरोहितीं[1] कीं मुख्य असा मी बृहस्पती नामीं[2] ।**
**सागर सरोवरीं मी सेनानीमाजि कार्तिकस्वामी ॥ २४ ॥**

महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥

**भृगु मी महर्षिमाजी वाणींत प्रणवें[3] मी असें ज्ञातें[4] ।**
**मी स्थावरीं[5] हिमालय जपयज्ञहि मी समस्त यज्ञांत ॥ २५ ॥**

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गंधर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥

**अश्वत्थ[6] सर्व वृक्षीं मी देवर्षींत नारदस्वामी ।**
**सिद्धांत कपिल मुनि मी गंधर्वांमाजि चित्ररथ तो मी ॥ २६ ॥**

उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
ऐरावतं गजेंद्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥

**क्षीराब्धिजन्य[7] तो मी अश्वीं[8] उच्चैःश्रवा असें वाजी ।**
**गजराजीं ऐरावत जाणे नरराज[9] मी नरांमाजी ॥ २७ ॥**

आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कंदर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥

**मी वज्र आयुधीं कीं स्रजितीं[10] संतान मीच कंदर्प[11] ।**
**धेनूंत कामधेनू सर्पी मी जाण वासुकी सर्प ॥ २८ ॥**

अनंतश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।
पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥

---

१ उपाध्यायांत. २ नांवाचा. ३ ओंकार. ४ सर्वश्रुत. ५ स्थिरपदार्थांमध्यें. ६ पिंपळ. ७ क्षीरसमुद्रापासून उत्पन्न झालेला. ८ अश्व. ९ राजा. १० उत्पन्नकर्ता. ११ मदन.

नागांत शेष तो मी जलजंतूंमाजि[1] वरुण हा नियम ।
पितरांत अर्यमा मी निग्रहकर्त्यांत[2] जाण मीच यम ॥ २९ ॥

प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।
मृगाणां च मृगेंद्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥

पक्ष्यांत गरुड तो मी दैत्यीं प्रऱ्हाद मीच तो बाळ ।
पशुंमाजि सिंह तो मी चालनकर्त्यांत मी महाकाळ ॥ ३० ॥

पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।
झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥

उडत्यांत मीच वायू शस्त्रधरांमाजि राम कीर्तिकर ।
सरितांत[3] जान्हवी[4] मी मत्स्यांमाजी समस्त मी मकर[5] ॥ ३१ ॥

सर्गाणामादिरंतश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥

मी आदि जाण पार्था! मध्यहि मी अंत मीच सृष्टीचा ।
विद्येंत आत्मविद्या वादीं मी वाद तत्त्वदृष्टीचा ॥ ३२ ॥

अक्षराणामकारोऽस्मि द्वंद्वः सामासिकस्य च ।
अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

मी अक्षरीं अकार द्वंद्व समासांत मीच तें रूप ।
मी अक्षय काल असें मी सर्वाधार मी जगद्रूप ॥ ३३ ॥

मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥

मी मृत्यु सर्वहर्ता जन्म निपजत्यांत[6] मी मनीं आणीं ।
नारींत कीर्ति लक्ष्मी स्मृति धृति मी बुद्धि मी असें वाणी ३४

बृहत्साम तथा साम्नां गायत्री छंदसामहम् ।
मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥

---

१ जलचरांमध्यें. २ शासन कर्त्यांमध्यें. ३ नद्यांमध्यें. ४ भागीरथी. ५ नक्र.
६ जन्म घेणाऱ्यांमध्यें.

**सामांत बृहत्सामहि गायत्री मीच सर्वही छंदीं।**
**मासांत मार्गशीर्षहि आहें मी तो वसंत ऋतुवृंदीं[1] ॥ ३५ ॥**

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम्।
जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६ ॥

**मी सुप्रभीं[2] प्रभा ती द्यूत[3] असें मीच कपटकर्त्यांत।**
**जय मी निश्चयही मी समजें मी सत्त्व सत्त्ववंतांत ॥ ३६ ॥**

वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पांडवानां धनंजयः।
मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥

**वृष्णींत[4] कृष्ण तो मी अर्जुन मी पांडवांत तव नामीं।**
**व्यासहि मुनींत तो मी कविंमाजी सुप्रसिद्ध उशना[5] मी ॥ ३७**

दंडो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम्।
मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥

**शास्त्यांत दंड तो मी नीति असें जिंकित्यांत[6] मी मान।**
**गुह्यांत मौन तें मी ज्ञान्यांमाजी अखंड मी ज्ञान ॥ ३८ ॥**

यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन।
न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥

**सर्वां भूतांचें ह्या बीज असें मीच अर्जुना! नित्य।**
**मजविण घडे न कांहीं भूतीं किंवा चराचरीं कृत्य ॥ ३९ ॥**

नांतोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप।
एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥

**नाहीं खराच माझ्या दिव्य विभूतींस अर्जुना! पार[7]।**
**संप्रति संक्षेपानें सांगितला मी तरीहि विस्तार ॥ ४० ॥**

यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

---

१ सर्व ऋतूंमध्यें. २ तेजस्वी पदार्थांत. ३ जुवा. ४ यादवांमध्यें. ५ शुक्र. ६ जिंकणारांमध्यें. ७ अंत.

**जो जो श्रीमंत दिसे   प्राणी जन थोर भाग्यसंपन्न ।**
**तो तूं जाण सख्यारे!   माझ्या तेजेंचि होय उत्पन्न ॥ ४१ ॥**

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥

**आतां तुज किति सांगूं   किति तूंही ऐकशील बापा! हें ।**
**व्यापुनि एकांशें मी   सारें ब्रह्मांड राहिलों आहें ॥ ४२ ॥**

इति श्रीमद्भगव० विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

**दहावा अध्याय समाप्त.**

# अध्याय ११ वा.

## अर्जुन उवाच ।

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।
यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥

### अर्जुन—

**मदनुग्रहार्थ[1] उत्तम अध्यात्माचा प्रसाद जो केला ।**
**त्या गुह्य भाषणानें माझा हा मोह सर्वही गेला ॥ १ ॥**

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥

**जन्ममरण भूतांचें ऐकें मी तुजकडून विस्तारें ।**
**कमलाक्षा[2]! दिव्य असें आहे माहात्म्य हें तुझें सारें ॥ २ ॥**

एवमेतद्यथात्थत्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

**तूंही तसेच निजगुण बोलशि परमेश्वरा! महा बाहो! ।**
**तें विश्वरूप ह्यास्तव इच्छीं पुरुषोत्तमा! तुझें पाहों ॥ ३ ॥**

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।
योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥

**जरि मी पहावयाला योग्य असें वाटलें तुला देवा! ।**
**परमेश्वरा! तरी तूं दावीं त्वद्दिव्यरूप[3] मज ठेवा ॥ ४ ॥**

## श्रीभगवानुवाच ।

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

### श्रीभगवान्—

**पार्था! दिव्य पहा हीं माझीं रूपें सहस्रशा शतशा[4] ।**
**नानाप्रकारचीं हीं नानापरि वर्ण आकृतीहि तशा ॥ ५ ॥**

---

१ माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं. २ हे कमलनयना! ३ तुझा विश्वस्वरूपरूपी. ४ शेकडों.

विराट्स्वरूप.

अ० ११ श्लोक १५।१६.




विश्वरूपदर्शन.

पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥

**वसु रुद्र अश्विनीसुत[1] पाहें आदित्य मरुत बापा ! हे ।**
**पार्था ! अपूर्व येथें आश्चर्यें कितिक राहिलीं पाहें ॥ ६ ॥**

इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥

**पाहें चराचरासह पार्था ! एकत्र आज हें येथें ।**
**मद्देहीं[2] जग सारें ह्याहुनिही अन्य जें हवें तें तें ॥ ७ ॥**

न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।
दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

**परि याच दृष्टिनें तूं पाहों शकसी मला न बापा हे ! ।**
**तुज दिव्य दृष्टि देतों तेणें हा योग ईश्वरी पाहें ॥ ८ ॥**

**संजय उवाच ।**

एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

**संजय—**

**राजा[3] ! ऐसें हरि तो योगेश्वर वदुनि कुंतितनुजाला[4] ।**
**प्रेमेंकरून अपुलें परमेश्वररूप दाविता झाला ॥ ९ ॥**

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

**वदनें अनेक लोचन अद्भुत बहु भव्य दर्शनें युक्त ।**
**दिव्याभरणें नाना दिव्य करीं शस्त्रभार[5] उद्युक्त ॥ १० ॥**

दिव्यमाल्यांबरधरं दिव्यगंधानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनंतं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

**धरि दिव्य वसन पुष्पें दिव्य असा गंध चर्चिला[7] वाहे[8] ।**
**ऐसा अनंतरूपी आश्चर्यें विश्व कोंदुनी[9] राहे ॥ ११ ॥**

---

१ अश्विनीकुमार. २ माझ्या देहांत. ३ हे धृतराष्ट्रा ! ४ अर्जुनाला. ५ शस्त्रसंघ. ६ परजलेला. ७ लावलेला. ८ सुवास सुटलेला. ९ भरून.

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥

**गगनीं सहस्र रविंचें एकसरें[1] प्रगट होय तेज जरी।**
**देवा महात्मयाच्या तेजाची तें करी तरी न सरी[2] ॥ १२ ॥**

तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।
अपश्यद्देवदेवस्य शरीरे पांडवस्तदा ॥ १३ ॥

**तेव्हां तेथें पांडवें[3] एकामाजी अनेकधा[4] भिन्न ।**
**देवेशाच्या देहीं पाहे ब्रह्मांड हें अविछिन्नें[5] ॥ १३ ॥**

ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।
प्रणम्य शिरसा देवं कृतांजलिरभाषत ॥ १४ ॥

**रोमांच उठुनि अर्जुन आश्चर्याच्या पडे प्रवाहांत ।**
**साष्टांग वंदुनीयां बोले देवास जोडुनी हात ॥ १४ ॥**

**अर्जुन उवाच ।**

पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थमृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥

**अर्जुन—**

**पाहें त्वद्देहीं मी देवा! स्थिरचर भरूनि सर्व जग ।**
**कमलासनस्थ[6] विधिहीं[7] ऋषि सारे देव दिव्यही भुजग[8] ॥ १५ ॥**

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनंतरूपम् ।
नांतं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥ १६ ॥

**उदरें कर नयन किती अंत न रूपा चहूंकडे अससी ।**
**आद्यंत न मध्य तुला विश्वेशा! विश्वरूप तूं दिससी ॥ १६ ॥**

किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमंतम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समंताद् दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

**चक्रकिरीटगदाधर कोंदे सर्वत्र तेज हें भारी ।**
**बघवे तुला न दीप्ती[9] सूर्याग्नीशीं अपार तव सारी ॥ १७ ॥**

---

१ एकाच वेळीं. २ बरोबरी. ३ अर्जुन. ४ अनेकप्रकारें. ५ संपूर्ण. ६ कमलासनावर बसलेला. ७ ब्रह्मदेवसुद्धां. ८ सर्प. ९ प्रभा.

त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

**अक्षर[1] तूं वेद्यहि[2] तूं आत्मा तूं परम ह्या निधान[3] जगा ।**
**तूं धर्मपाळ अव्यय शाश्वतचा पुरुष वाटशी मज गा! ॥ १८**

अनादिमध्यांतमनंतवीर्यमनंतबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपंतम् ॥ १९ ॥

**आद्यंत न मध्य तुला दिसति भुजा अमित[4] नेत्र शशिसूर्य ।**
**वदनीं ज्वाला जग हें तापे तेजें अनंत तव वीर्य[5] ॥ १९ ॥**

द्यावापृथिव्योरिदमंतरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥

**भूस्वर्गाचें अंतर दाहि दिशा करिशि एकटा व्याप्त ।**
**त्वद्रूप उग्र अद्भुत पाहुनि त्रैलोक्य होय संतप्त[6] ॥ २० ॥**

अमी हि त्वां सुरसंघा विशंति केचिद्भीताः प्रांजलयो गृणंति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसंघाः स्तुवंति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥२१॥

**सुर हे तुझ्यांत शिरती कितिक भयें स्तुति कृतांजली[7] करिती ।**
**स्वस्ति[8] ह्मणुनि सिद्धऋषी स्तवन तुझें मांडिती अनेक रिती २१**

रुद्रादित्या वसवो ये च साध्या विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गंधर्वयक्षासुरसिद्धसंघा वीक्षंते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

**वसुरुद्रादित्य[9] मरुत् - विश्वेदेवोष्मपाश्विनीकुमर[10] ।**
**गंधर्व यक्ष विस्मित बघती तुज सिद्ध साध्यही अमर[11] ॥ २२ ॥**

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥

**दाढा मांड्या उदरें कर पद डोळे मुखें अमित बा! हीं! ।**
**पाहुनि विशाल रूपा भ्यालें हें विश्व त्यासवें मीही ॥ २३ ॥**

---

१ अविनाशी. २ जाणण्यास योग्य. ३ श्रेष्ठस्थान. ४ असंख्य. ५ पराक्रम. ६ त्रस्त. ७ हात जोडून. ८ शांति असो. ९ वसु-आठ-रुद्र-अकरा-आणि आदित्य-बारा. १० विश्वेदेव, उष्मपा-पितर-आणि आश्विनीकुमार. ११ देव.

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितांतरात्मा धृतिं न विंदामि शमं च विष्णो ॥ २४ ॥

**नभचुंबित कांति महा अतुला दीप्ती विशाल नेत्रांस ।**
**विस्तृत मुख पाहुनियां धैर्य नुरे चित्त पावतें त्रास ॥ २४ ॥**

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

**दाढा विक्राळ मुखें कालाग्नीतुल्य हीं तुझी ईशा ।**
**पाहुनि दिशाहि भुललों चैन नसे हो प्रसन्न जगदीशा !॥२५॥**

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः सर्वे सहैवावनिपालसंघैः ।
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥

**हे धार्तराष्ट्र[1] किंवा तत्पक्षी[2] भूमिपाळ हे सारे ।**
**भीष्मद्रोणहि कर्णहि अमुच्यांतिल मुख्य वीरही बारे ! ॥२६॥**

वक्त्राणि ते त्वरमाणा विशंति दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनांतरेषु संदृश्यंते चूर्णितैरुत्तमांगैः ॥ २७ ॥

**विक्राळ दंत ऐशा तव वदनीं धांवतात संपूर्ण ।**
**अडकुनि कितिक दांती झालीं दिसतात मस्तकें चूर्ण ॥ २७ ॥**

यथा नदीनां बहवोऽबुवेगाः समुद्रमेवाभिमुखा द्रवंति ।
तथा तवामी नरलोकवीरा विशंति वक्त्राण्यभिविज्वलंति ॥ २८ ॥

**सागरसन्मुख वेगें सरितांचें[3] जेविं जातसे नीर[4] ।**
**तेवीं प्रदीप्त तुझिया धांवति वदनीं नृलोकिंचे वीर ॥ २८ ॥**

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशंति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशंति लोकास्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

**घेउनि उड्या जसे कां अग्निज्वालीं पतंग मरतात ।**
**त्वद्वदनीं वेगानें तेविं मरायास लोक शिरतात ॥ २९ ॥**

लेलिह्यसे ग्रसमानः समंताल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं भासस्तवोग्राः प्रतपंति विष्णो ॥ ३० ॥

**ज्वालामुखें करूनी चाटिशि जिभल्या कशा जनग्रास ।**
**तव उग्रतेज भरुनी विश्व, विभो ! तापवी समग्रांस ॥ ३० ॥**

---

१ कौरव. २ त्याच्या पक्षास असणारे. ३ नद्यांचें. ४ पाणी.

आख्याहि मे को भवानुग्ररूपो नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवंतमाद्यं न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥

**तूं कोण उग्र सांगें जाणावें आद्यरूप[1] हा हेतू ।**
**होईं प्रसन्न नमितों देवेशा ! काय मांडिलें हें तूं ॥ ३१ ॥**

**श्रीभगवानुवाच ।**

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यंति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥

**श्रीभगवान्–**

**मी लोक संहराया काळ असें सिद्ध वृद्ध[2] ऐसा रे! ।**
**तूं मारिशी न तरि ही मरतिल योद्धे रणांत हे सारे ॥ ३२ ॥**

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून्भुंक्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥

**यश घे ऊठ ह्मणोनी जिंकुनि शत्रूस भोग ही अवनी[3] ।**
**पूर्विच वधिले मी हे हो तूं त्याला निमित्तमात्र धनी ॥ ३३ ॥**

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

**भीष्म द्रोण जयद्रथ कर्णादिक अन्य शूर जे लोक ।**
**मी वधिले वधुनि रणीं घेइं जयश्री[4] करूं नको शोक ॥ ३४ ॥**

**संजय उवाच ।**

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य कृतांजलिर्वेपमानः किरीटी ।
नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥

**संजय–**

**भगवद्वाणी ऐकुनि कांपे तो हात जोडुनी विजय[5] ।**
**वरिंवरि[6] वंदुनि! हरिते सद्गद बोले धरूनि फार भय ॥ ३५ ॥**

---

१ मूळ स्वरूप. २ पुरातन, अनादि. ३ पृथ्वी. ४ यश. ५ अर्जुन.
६ पुनःपुन्हा.

अर्जुन उवाच ।

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवंति सर्वे नमस्यंति च सिद्धसंघाः ॥ ३६ ॥

अर्जुन—

**त्वत्कीर्तीनें देवा ! जग झालें प्रेमहर्षसंयुक्त ।**
**राक्षस धाकें पळती वंदिति तुज सिद्धसंघ जे मुक्त ॥ ३६ ॥**

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।
अनंत देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥

**नमिती कां न समर्था! तुज कीं विधिचाहि आद्य तूं कर्ता ।**
**ईश्वर अनंत तो तूं सदसत्पर तूं सदा जगद्भर्ता[1] ॥ ३७ ॥**

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ ३८ ॥

**पुरुष पुरातन आदी विश्वनिधानासि तूंच कीं हेतू ।**
**[2]सुस्थळ वेत्ता[3] वेद्यहि[4] व्यापिशि विश्वा अनंत रूपें तूं ॥ ३८ ॥**

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥

**[5]प्रपितामह प्रजापति तूं शशिवरुणाग्नि वायु तूं शमन[6] ।**
**नमितों सहस्र वेळां तुजला करितों पुनःपुन्हा नमन ॥ ३९ ॥**

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंत वीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥

**पुढती तसेंच मागें वंदी सर्वत्र सर्व तुज पायीं ।**
**बलनिधि विक्रमशाली सर्वीं सर्वत्र सर्व तूं ठायीं ॥ ४० ॥**

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥

**प्रेमांत कीं प्रमादें[7] नेणुनि महिमा तुझा भवत्तेजें[8] ।**
**सम[9] मानुनि सलगीनें वदलों कृष्णा ! अरे ! गड्या ! जें जें ४१**

---

१ जगाचें पोषण करणारा. २ उत्तम स्थान. ३ ज्ञाता. ४ जाणण्यास योग्य. ५ पणजा. ६ यम. ७ चुकून. ८ तुझ्या खऱ्या प्रभावानें. ९ बरोबरीचा.

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

**एकांतीं लोकांतीं निजतां बसतां फिरावया जातां ।**
**अवमानिलें[1] विनोदें त्याची देवा ! क्षमा करा आतां ॥ ४२ ॥**

पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३ ॥

**स्थिरचरलोकांचा तूं बाप गुरुश्रेष्ठ पुण्य पूज्य महा ।**
**सम न तुला अधिक कवण त्रिभुवनिंही त्वत्प्रभाव अनुपम हा**

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

**ह्मणुनी प्रसन्न हो मज शिरसि नमीं मी क्षमा करा जेवीं ।**
**पुत्रास तात करितो मित्रा मित्र प्रिय प्रिया तेवीं ॥ ४४ ॥**

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

**पाहुनि अपूर्व झाला हर्ष परी भीति वाटते पोटीं ।**
**देवा ! प्रसन्न होउनि दावीं पहिलें स्वरूप जगजेठी ! ॥ ४५ ॥**

किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

**चक्रकिरीटगदाधर- घे पहिलें रूप तूं चतुर्बाहो ! ।**
**अमितकरा[2] ! विश्वमया[3] ! त्या रूपें इच्छितों तुला पाहों ॥४६**

**श्रीभगवानुवाच ।**

मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनंतमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

**श्रीभगवान्–**

**'मी रूप आत्मयोगें विजया ! तुज दाविलें असें हें जें ।**
**तुजविण'कोणी न बघे विश्वात्मक[4] जें अनंत बहु तेजें ॥४७॥**

---

१ अपमान केला. २ अनंतहस्ता ! ३ विश्वव्यापे ! ४ विश्वव्यापक.

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥

**नरलोकीं[1] उग्र तपें दानें यज्ञें न वेद-अध्ययनें ।**
**ह्या रूपें तुजविण मज शक्य पहाया न अन्य ह्या नयनें ॥४८॥**

मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

**न धरीं भय कीं चिंता पाहुनि घोर स्वरूप बापा ! हें ।**
**प्रेमें निर्भय चित्तें पुनरपि मत्पूर्वरूप[2] बा ! पाहें ॥ ४९ ॥**

**संजय उवाच ।**

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

**संजय—**

**ऐसें वदोनि पुनरपि भ्यालेल्या वासुदेव पार्थासी ।**
**घेवोनि सौम्यरूपा दाउनि पूर्वस्वरूप आश्वासी ॥ ५० ॥**

**अर्जुन उवाच ।**

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

**अर्जुन—**

**दाविशि मनुष्यरूपा देवा ! माझी करूनियां कींव[3] ।**
**आतां सावध झालों आला माझ्या जिवामधें जीव ॥ ५१ ॥**

**श्रीभगवानुवाच ।**

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥

**श्रीभगवान्—**

**ऐसें रूप पहाया माझें पडतात फार आयासें[4] ।**
**ह्या रूपाला देवहि उत्सुक असती सदा पहायास ॥ ५२ ॥**

---

१ मृत्यु लोकांत. २ माझें पहिलें स्वरूप. ३ दया. ४ श्रम.

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

**वेदें यज्ञें दानें केलें तप कीं किती जरी काज[1] ।**
**न च शक्य मी पहाया जैसा तूं पाहशी मला आज ॥ ५३ ॥**

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

**तो मी जाणायाला सत्तत्त्वें धरिल भक्ति एकोपा ।**
**त्याला पहावया कीं मद्रूपीं ऐक्य व्हावया सोपा ॥ ५४ ॥**

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पांडव ॥ ५५ ॥

**करितो मदर्थ कर्मैं निस्पृह मद्भक्त थोर मी ज्यातें ।**
**निर्वैर सर्व भूतीं[2] पार्था ! तो पावतो सदा मातें ॥ ५५ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु० विश्वरूपदर्शनयोगो
नामैकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

**अकरावा अध्याय समाप्त.**

१ कार्य, कर्म. २ प्राणिमात्राशीं.

# अध्याय १२ वा.

अर्जुन उवाच ।

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

अर्जुन–

युक्त[1] सतत ऐसे जे भक्त तुझे तव उपासनीं रमते ।
कीं अक्षर[2] अव्यक्तीं[3] त्यांमध्यें कोण योगवित्तम[4] ते ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥

श्रीभगवान्–

मन ठेवुनि मद्रूपीं चित्तें मजला न चिंतिती अन्यें[5] ।
परम श्रद्धेनें जे असति मला तेच सर्वदा मान्य ॥ २ ॥

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिंत्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥

निर्गुण अवाच्य[6] अक्षर सर्वव्यापी अचिंत्य जें लोकां ।
ध्रुव[7] कूटस्थ[8] अचल ही ऐशा रूपा उपासिती जे कां ॥ ३ ॥

संनियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवंति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

दमिती इंद्रियगण जे ज्यांची सर्वत्र बा! समान मती[9] ।
मातेंचि पावती ते भूतहितामाजि[10] जे सदा रमती ॥ ४ ॥

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

---

१ परिपूर्ण. २ निराकार. ३ निर्गुण. ४ श्रेष्ठयोगी. ५ इतर. ६ अनिर्वाच्य. ७ अढळ. ८ निर्विकार. ९ बुद्धि. १० प्राणिमात्रांच्या कल्याणामध्येंच.

परि [1]अव्यक्तीं चित्ता योजाया क्लेश फार ह्या देहीं।
ह्मणुनीच आकलाया निर्गुण तें दुःख पावती देही[2] ॥ ५ ॥

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः।
अनन्येनैव योगेन मां ध्यायंत उपासते ॥ ६ ॥

सर्वस्व मीच मानुनि मजला प्रत्येक अर्पुनी कृत्य।
मातें अनन्य योगें ध्याती प्रेमें उपासिती नित्य ॥ ६ ॥

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात्।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥

ऐसें मन्मनिं वसती त्यांना ह्या मृत्युरूप संसारीं।
उद्धारक होउनियां पार्था! मी शीघ्र त्यांतुनी तारीं[3] ॥ ७ ॥

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥

मजमाजी मन ठेवीं मजपासुनि बुद्धिला नको परतूं[4]।
तरि माझ्यांतच येशिल न धरीं संदेहही अतःपर[5] तूं ॥ ८ ॥

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥

आतां स्थिर करवेना माझ्याठायीं तुलाहि बुद्धि जरी।
अभ्यासें योगें तूं इच्छा मी तरि मिळावयास करी ॥ ९ ॥

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

अभ्यासहि करवेना तरि अर्पी कर्म तूं मला नित्य।
कर्मैं [6]मदर्थ करितां तुजला येईल सिद्धि हें सत्य ॥ १० ॥

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

हें ही न होय तरि तूं मद्योगाचा[7] करूनि आश्रय हा।
जिंकुनि मनास साऱ्या कर्मफलाचा करूनि त्याग रहा ॥ ११ ॥

---

१ निराकारामध्यें. २ देहधारी-प्राणी. ३ तारतों. ४ फिरवूं. ५ ह्यापुढें. ६ माझ्या प्रीत्यर्थ. ७ माझ्या योगाचा.

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥

**अभ्यासाहुनि मोठें ज्ञान जगीं ध्यान त्याचिया वरती ।**
**ध्यानाहुनि कर्मफल-त्याग महा शांति त्याहुनी परती[१] ॥ १२ ॥**

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

**कोणाचा द्वेष नसे मैत्री सर्वांसवें[२] दया पोटीं ।**
**निस्पृह[३] निरहंकारी[४] सुखदुःखीं सम जया क्षमा मोठी ॥ १३ ॥**

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

**संतुष्ट नित्य योगी अढळव्रत जो मनोजयें[५] युक्त ।**
**मन बुद्धि अर्पितो मज तो माझा आवडे मला भक्त ॥ १४ ॥**

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥

**भीती लोक न ज्याला लोकांपासूनि जो भयें मुक्त ।**
**हर्ष द्वेष न चिंता तो माझा आवडे मला भक्त ॥ १५ ॥**

अनपेक्षः शुचिर्दक्षः उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

**निस्पृह[६] पवित्र जो कां दक्ष[७] उदासीन जो व्यथामुक्त[८] ।**
**सर्वारंभत्यागी[९] तो माझा आवडे मला भक्त ॥ १६ ॥**

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥

**हर्ष द्वेष नसे कीं शोक नसे नित्य कामनामुक्त[१०] ।**
**टाकी शुभाशुभाला[११] तो माझा आवडे मला भक्त ॥ १७ ॥**

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥

---

१ पलीकडे. २ सर्वांबरोबर. ३ निरिच्छ. ४ निरभिमानी. ५ मनोनिग्रहानें. ६ निरिच्छ. ७ सावध. ८ दुःखमुक्त. ९ काम्यकर्माला आरंभ न करणारा. १० निरिच्छ. ११ चांगल्या वाइटाला.

शत्रूशीं मित्रांशीं  सम सम जो नित्य मानअपमानीं ।
निःसंग शीतउष्णा  सुखदुःखालाही तेंवि सम मानी ॥ १८ ॥

तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

निंदास्तुति सम, मौनी[1]  तोषे कांहींहि लाभ जो घडतां ।
स्थिरमति निराश्रयी[2] धरि  भक्ति, मला पुरुष तोच आवडता १९

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥

ह्या धर्मरूप ऐशा  अमृताचें पान ज्यां सदा घडतें ।
श्रद्धालु, थोर मी ज्यां  ते मज अत्यंत भक्त आवडते ॥ २० ॥

इति श्रीमद्भगवद्गीता०भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

बारावा अध्याय समाप्त.

१ बडबड करणारा नव्हे, स्तब्ध.  २ निःसग.

# अध्याय १३ वा.

### अर्जुन उवाच ।

इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते ।
एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥

### अर्जुन–

**पार्था! ह्या शरिराला क्षेत्र[1] असें ह्मणति सर्वतत्त्वज्ञ[2] ।**
**तें जाणता असे जो त्याला क्षेत्रज्ञ[3] बोलती तज्ञ[4] ॥ १ ॥**

### श्रीभगवानुवाच ।

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

### श्रीभगवान्–

**सर्वक्षेत्रांमाजी पार्था ! क्षेत्रज्ञ मी नसे अन्य ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञाचें जें आहे ज्ञान तें मला मान्य ॥ २ ॥**

तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।
स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥

**तें क्षेत्र जसें ज्यापरि ज्यापासुन तद्विकार जे कैक ।**
**क्षेत्रज्ञ तत्प्रभावहि[5] संक्षेपें करुनि सांगतों ऐक ॥ ३ ॥**

ऋषिभिर्बहुधा गीतं छंदोभिर्विविधैः पृथक् ।
ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

**ऋषिनीं वर्णन केलें बहुविध वेदांतही अनेक रिती ।**
**कीं ब्रह्मसूत्रपादीं सिद्धांतें युक्त वाक्यवृत्ति किती ॥ ४ ॥**

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च ।
इंद्रियाणि दशैकं च पंच चेंद्रियगोचराः ॥ ५ ॥

**पंच महाभूतें हीं बुद्धि अहंकार तेवि अव्यक्त[6] ।**
**मन इंद्रियें दहा कीं शब्दादी पांच विषय संयुक्त[7] ॥ ५ ॥**

---

१ शेत, देह. २ ज्ञाते. ३ आत्मा, जीव. ४ ते जाणणारे. ५ त्याची सत्ता. ६ माया, प्रकृति. ७ त्यांत धरून.

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

**सुखदुःख चेतना[1] धृति[2] वैरेच्छेचा[3] समग्र संभार[4] ।**
**क्षेत्र तुला संक्षेपें कथिलें मी हें समग्र सविकार[5] ॥ ६ ॥**

अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥

**श्लाघा[6] न दंभ[7] चित्तीं शांति अहिंसा[8] अवक्रता[9] धरणें ।**
**गुरुसेवा निर्मलता स्थैर्य मनोनिग्रहादि जें करणें ॥ ७ ॥**

इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

**निरहंकारमनानें विषयत्यागांत मानणें तोष ।**
**स्मरणें चित्तीं जन्म व्याधिजरामरणदुःख हे दोष ॥ ८ ॥**

असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु ।
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥

**निशिदिनिं अलिप्त असणें ममता धरणें न दारसुतगेहीं[10] ।**
**समचित्त नित्य वरणें इष्टानिष्टोपपत्तियोगेंही[11] ॥ ९ ॥**

मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।
विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥

**धरणें अव्यभिचारी[12] योगें अद्वैतभक्ति माझ्यांत ।**
**एकांतीं आवड बहु कंटाळा यावया समाजांत[13] ॥ १० ॥**

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥

**अध्यात्मज्ञान सदा घेणें दृश्यांकडूनही[14] ज्ञान ।**
**ह्याला ज्ञान ह्मणावें ह्याच्या व्यतिरिक्त[15] तेंच अज्ञान ॥ ११ ॥**

---

१ चैतन्य. २ धैर्य, धारणा. ३ द्वेष आणि इच्छा ह्यांचा. ४ समुदाय. ५ विकारासहवर्तमान. ६ आत्मप्रौढी. ७ ढोंग, कृत्रिम. ८ निरुपद्रवीपणा. ९ सरळता. १० पुत्रदारागृहादिकांमध्यें. ११ कोणतेंही इष्ट अनिष्ट प्राप्त झालें तरीसुद्धां. १२ निर्मल. १३ समुदायामध्यें. १४ जडाकडून. १५ शिवाय, दुसरें.

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥

**कथितों ज्ञेय[1] तुला जें जाणुनियां मुक्ति लाभते नित्य ।**
**परम ब्रह्म सनातन ह्मणवेना जें असत्य कीं सत्य ॥ १२ ॥**

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

**सर्वत्र पाद[2] पाणी[3] वदनें सर्वत्र नयन वीरा[4] हे ! ।**
**कानहि जिकडे तिकडे व्यापुनि सर्वत्र सर्व जें राहे ॥ १३ ॥**

सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥

**इंद्रियहीन तरी ही करितें जें विषय इंद्रियां भास ।**
**सर्वाधार असक्तहि भोगी निर्गुण असून गुणरास[5] ॥ १४ ॥**

बहिरंतश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चांतिके च तत् ॥ १५ ॥

**बाहेर आंत राहे भूतांच्या[6] चरहि आणि जें अचर ।**
**न कळे सूक्ष्म ह्मणोनी सन्निध ही जे असूनि दूरतर ॥ १५ ॥**

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

**भिन्न नसुनि भूतांहुनि राहे भिन्नापरी-समग्रांस ।**
**तें ज्ञेय जें धरोनी निर्मुनि भूतें करी जनग्रास[7] ॥ १६ ॥**

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते !
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥

**तत्तेज तेजसांतिल बोलति परतें[8] तमाहुनी आहे ।**
**ज्ञानज्ञेयज्ञानें लाभे, सर्वांतरांत[9] जें राहे ॥ १७ ॥**

---

१ जाणण्यास योग्य. २ पाय. ३ हात. ४ हे शूरा अर्जुना ! ५ गुणांचे समुदाय. ६ प्राण्यांच्या. ७ जनाचा क्षय. ८ पलीकडे, श्रेष्ठ. ९ सर्वांच्या अंतःकरणांत.

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।
मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

**ऐसें क्षेत्र ज्ञान ज्ञेयहि कथिलें करून संक्षेप ।**
**मद्भक्त जाणुनी हें मद्रूपीं पावतो अविक्षेपें[1] ॥ १८ ॥**

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥

**प्रकृति पुरुष दोन्हीही जाण सख्या ! तूं अनादि हीं असती ।**
**प्रकृतीपासुनि लोकीं गुण तैसे हे विकार उद्भवती ॥ १९ ॥**

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

**कर्तृत्व कार्य कारण हेतु असे प्रकृति जाण बा ! हें तूं ।**
**तैसा सुखःदुखाच्या भोक्तृत्वीं पुरुष बोलिला हेतू ॥ २० ॥**

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।
कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥

**मायेंत पुरुष राहुनि भोगी मायागुणांस हा पाहे ।**
**गुणसंगतीनिमित्तें योनीही उच्च नीच तो वाहे ॥ २१ ॥**

उपद्रष्टानुमंता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

**भर्ता भोक्ता साक्षी अनुमंता[2] श्रेष्ठ ईश्वरा वरता ।**
**परमात्मा ह्मणति जया देहीं ह्या पुरुष जो असे परता[3] ॥ २२ ॥**

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

**जाणे जो ह्या पुरुषा मायेलाही तिच्या गुणावरुनी ।**
**असतां सदा प्रपंचीं जन्मा येई कधीं न तो फिरुनी[4] ॥ २३ ॥**

ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥

---

१ निर्विघ्नपणें. २ जाणता. ३ श्रेष्ठ, निराळा. ४ पुन्हा.

ध्यानें बघती कोणी कोणी आत्म्यास पाहती देहीं[1] ।
कोणी सांख्यें[2] योगें[3] दुसरे कितिएक कर्मयोगेंही[4] ॥ २४ ॥

अन्ये त्वेवमजानंतः श्रुत्वान्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरंत्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥

किति नेणतीच आत्मा कोणी ऐकुनि उपासना करिती ।
श्रुतितत्पर[5] ऐसे जे तेही ह्या मृत्युसागरीं[6] तरती ॥ २५ ॥

यावत्संजायते किंचित्सत्वं स्थावरजंगमम् ।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥

जीव चराचर[7] पार्था ! जें जें उत्पन्न ह्या जगीं होतें ।
क्षेत्रक्षेत्रज्ञाच्या[8] संयोगें[9] सर्व होतसे तें तें ॥ २६ ॥

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठंतं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यंतं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥

सर्वां भूतीं सम जो परमेश्वर भरुनि सर्वदा राहे ।
नाशे सर्व तरी तो अविनाशी[10] नेत्रयुक्त[11] तो पाहे ॥ २७ ॥

समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।
न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥

सर्वत्र स्थित सम जो परमेश्वर पाहतो सदा जगतीं ।
तो एक आत्मघाता न करुनि पावे पुढें हि परमगती[12] ॥ २८ ॥

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥

झाडुनि सारीं कर्में करिते ही प्रकृति जाण बापा ! हे ।
पाहे तेव्हां आत्मा तोच अकर्ता असें मनीं पाहे ॥ २९ ॥

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥

---

१ देहामध्यें. २ ज्ञानदृष्टीनें, तत्त्वदृष्टीनें. ३ सर्वव्यापी अशा दृष्टीनें, स्वरूपाशीं तादात्म्य पावून. ४ फलेच्छा सोडून कर्म करून. ५ केवळ ऐकणारेच. ६ जन्मसंसारांतून. ७ स्थावरजंगम. ८ देह आणि आत्मा ह्यांच्या. ९ मिश्रणानें. १० चिरंजीव. ११ डोळस, ज्ञानी. १२ दिव्यगति.

**आत्मैक्यरूप पाहे भूतांचे भिन्न भाव हे जेव्हां ।**
**विस्तार त्याच पासुनि जाणे तो ब्रह्म पावतो तेव्हां ॥ ३० ॥**

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौंतेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

**निर्गुण अनादि ह्मणुनी परमात्मा नित्य सत्य हा शुद्ध ।**
**देहीं[1] असोनि पार्था ! न करी कांहीं नव्हे कधीं बद्ध ॥ ३१ ॥**

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥

**व्यापुनि सर्वां न मळे सूक्ष्मत्वें गगन[2] सर्वथा शुद्ध ।**
**सर्वां देहीं तैसा आत्मा राहोनियां नसे बद्ध ॥ ३२ ॥**

यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

**जैसा प्रकाश देतो अखिलजगाला सदैव एक रवी[3] ।**
**[4]क्षेत्रें क्षेत्रज्ञ[5] तशीं प्रकट करी हा समस्तही वरवीं[6] ॥ ३३ ॥**

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमंतरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यांति ते परम् ॥ ३४ ॥

**क्षेत्रक्षेत्रज्ञांतिल[7] भेद असा ज्ञानदृष्टिनें युक्त[8] ।**
**[9]भूतस्वभाव जड[10] कीं जाणति सोडावयास[11] ते मुक्त[12] ॥ ३४ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीता० प्रकृतिपुरुषनिर्देशयोगो नाम
त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

**तेरावा अध्याय समाप्त.**

---

१ शरीरामध्यें. २ आकाश. ३ सूर्य. ४ देह. ५ आत्मा. ६ उत्तमोत्तम. ७ देह व आत्मा ह्यांच्यांतील. ८ नीट. ९ प्राण्यांचे धर्म, विकार. १० स्थूल. ११ टाकावयाला. १२ तेच मोक्षाला योग्य.

## अध्याय १४ वा.

### श्रीभगवानुवाच ।

परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥

### श्रीभगवान्—

**ज्ञानांतिल उत्तम हें ज्ञान तुला फिरुनि सांगतों बारे ! ।**
**जें जाणुनी मुनीही सिद्धि जगामाजिं पावले सारे ॥ १ ॥**

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।
सर्गेऽपि नोपजायंते प्रलये न व्यथंति च ॥ २ ॥

**ह्याचि ज्ञानाधारें माझें तादात्म्य[१] पावतात सदा ।**
**नुपजेंति[२] सृष्टी होतां प्रळयीं त्यांना नव्हे व्यथाहि कदा ॥ २ ॥**

मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।
संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥

**माझें गर्भस्थान प्रकृति तिच्यामाजिं धरुनि हेतूतें ।**
**मी गर्भ ठेवितों तें होतीं पार्था ! समस्त हीं भूतें ॥ ३ ॥**

सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवंति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

**सर्वहि योनींमाजीं जे जे उत्पन्न देह होतात ।**
**माया त्यांची माता मी आहें बीज पेरिता तात ॥ ४ ॥**

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

**सत्त्वरजस्तम होती प्रकृतिमुळें गुण समस्त या देहीं ।**
**पार्था ! बद्ध करीती देहीं अव्यय असून हा देही ॥ ५ ॥**

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥ ६ ॥

---

१ मद्रूप होतात. २ जन्म घेत नाहींत.

**निर्दोष सुप्रकाशित निर्मल तें सत्त्व त्यामधें शुद्ध ।**
**ज्ञानसुखाच्या संगें पार्था ! जीवां करीतसे बद्ध ॥ ६ ॥**

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥ ७ ॥

**रज तें विषयीं लोलुप तृष्णासंगें समुद्भवे[1] देहीं ।**
**कर्मांच्या संगानें बांधी पार्था ! तया सर्व देही ॥ ७ ॥**

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

**अज्ञानें उपजे तम पाडी मोहांत सर्व देह्यांस ।**
**निद्रा प्रमाद आळस ह्यांनीं बांधून टाकितें त्यांस ॥ ८ ॥**

सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥

**सत्त्व सुखांतचि वाढे पार्था ! कर्मामधेंहि रज वाढे ।**
**ज्ञानासि वेष्टुनी तम करितें लोकीं प्रमाद बहु गाढें[2] ॥ ९ ॥**

रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।
रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥

**मोडुनि रज तम केव्हां पार्था ! हें सत्त्व होतसें प्रबळ ।**
**रजसत्त्वा तमहि कधीं सत्त्व तमा रजहि मोडितें निवळ ॥१०॥**

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥

**सर्वेंद्रियांत देहीं प्रगटुनियां ज्ञान राहतें जेव्हां ।**
**सत्यप्रकाश पडतो जाणावें सत्त्व वाढलें तेव्हां ॥ ११ ॥**

लोभः प्रवृत्तिरारंभः कर्मणामशमः स्पृहा ।
रजस्येतानि जायंते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥

**कर्मीं प्रवृत्ति मोठी शांति नसे लोभ वाढवी बुद्धि ।**
**इच्छा प्रबळ उठे तैं जाणावी जाहली रजोवृद्धि ॥ १२ ॥**

अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।
तमस्येतानि जायंते विवृद्धे कुरुनंदन ॥ १३ ॥

---

१ उदय पावतें. २ प्रबळ.

**मोहें प्रमाद घडती न सुचे कर्तव्य कीं नसे शुद्धि[1]।**
**पार्था ! झाली ऐशी जाणावी तेधवां तमोवृद्धि ॥ १३ ॥**

यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।
तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥

**जाईल देहधारी मृत्युपथें[2] सत्त्ववृद्धिमाजिं जरी ।**
**ज्ञाते वसती ऐशा उत्तम लोकांस तोहि जाय तरी ॥ १४ ॥**

रजसि प्रलयं गत्वा कर्मसंगिषु जायते ।
तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

**वृद्धित मरे रजाच्या जन्मा ये कर्मठांत बापा ! तो ।**
**तम वाढुनी मरे जो तो पार्था ! मूढ योनिला जातो ॥ १५ ॥**

कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।
रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥

**सत्कर्माचें फल तें निर्मल सात्त्विक असे असें मान ।**
**फल दुःख तें रजाचें जाण तमाचें तसेंच अज्ञान ॥ १६ ॥**

सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।
प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

**लोभ रजापासुनियां सत्वापासून होतसें ज्ञान ।**
**मोह तमापासुनियां वाढे किंवा प्रमाद अज्ञान ॥ १७ ॥**

ऊर्ध्वं गच्छंति सत्वस्था मध्ये तिष्ठंति राजसाः ।
जघन्यगुणवृत्तिस्था अधोगच्छंति तामसाः ॥ १८ ॥

**सत्त्वस्थ दिव्य लोका जाती, राजस मधेंच वसतात ।**
**गुणवृत्ति निंद्य ऐसे तामस त्यांना घडे अधःपात[3] ॥ १८ ॥**

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

**न गुणावांचुनि कर्ता अन्य असें पाहणार जो पाहे ।**
**आत्मा निर्गुण समजे मद्रूपा तोच पावतो बा हे ! ॥ १९ ॥**

---

१ विचारच रहात नाहीं. २ मृत्यु पावेल. ३ अधोगति, नरकवास.

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

**देही तीन गुणातें लंघुनि हे सर्व देहसंस्कार ।**
**मुक्तिस भोगी होउनि जन्मजरामृत्युदुःखही पार ॥ २० ॥**

**अर्जुन उवाच ।**

कैर्लिंगैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।
किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥

**अर्जुन—**

**उलंघी त्रिगुणांतें कैशा तो लक्षणीं असे युक्त ।**
**कैसा वागे लोकीं? होतो त्रिगुणातुनी कसा मुक्त? ॥ २१ ॥**

**श्रीभगवानुवाच ।**

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पांडव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि कांक्षति ॥ २२ ॥

**श्रीभगवान्—**

**ज्ञानप्रवृत्ति पार्था ! मोहादी सर्व जाणतो कांहीं ।**
**कर्तव्यीं द्वेष[1] नसे निवृत्तीची नसे अपेक्षाही ॥ २२ ॥**

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणा वर्तंत इत्येव योऽवतिष्ठति नेंगते ॥ २३ ॥

**वसत उदासीन असा होय गुणें करुनियां न चंचळ तो ।**
**गुण सर्व वर्तती हें जाणुनि राहे, कधीं न जो चळतो ॥ २३ ॥**

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकांचनः ।
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिंदात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥

**प्रिय अप्रिय सुखदुःखें स्तुति निंदा आपुलीहि सम जाण ।**
**धैर्यें स्वस्थ, सदा सम ज्याला माती सुवर्ण पाषाण ॥ २४ ॥**

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।
सर्वारंभपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

---

१ कंटाळा, तिरस्कार.

मानीं अपमानीं सम सम जो कां सर्व शत्रुमित्रांस ।
सर्वारंभत्यागी[1] जाण गुणातीत[2] बोलती त्यास ॥ २५ ॥

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

अव्यभिचारें[3] योगें भक्तीनें मज भजे अहोरात्र ।
त्रिगुणांतें लंघुनि तो ब्रह्मत्वाला सदा असे पात्र ॥ २६ ॥

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकांतिकस्य च ॥ २७ ॥

एकांतिक[4] सौख्याचें वेदांचें नित्य शुद्ध मोक्षाचें ।
अक्षय धर्माचेंही स्थान असें मीच सर्वदां साचें ॥ २७ ॥

इति श्रीमद्भगव० गुणत्रयविभागयोगो नाम

चतुर्दशोऽध्यायः

चौदावा अध्याय समाप्त.

---

१ कर्मप्रवृत्ति व फल ह्यांचा त्याग करणारा. २ गुणापासून अलिप्त, निराळा. ३ एकनिष्ठ. ४ अद्वितीय, केवल.

# अध्याय १५ वा.

**श्रीभगवानुवाच ।**

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छंदांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

**श्रीभगवान्–**

**वरि मूळ अग्र[1] खालीं   अव्यय अश्वत्थ बोलती ज्यास ।**
**पर्णें वेद जया तीं   जाणे वेदज्ञ बोलती त्यास ॥ १ ॥**

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसंततानि कर्मानुबंधीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

**गुणवृद्ध[2] विषयपल्लव[3]   शाखा[4] त्याच्या प्रचंड वर खालीं ।**
**तळचीं मुळें शिरोनी   नरलोकीं कर्मबंधनें झालीं ॥ २ ॥**

न रूपमस्येह तथोपलभ्यते नांतो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा ॥ ३ ॥

**आद्यंत[5] न ठाव जया   मिथ्या जो कां सदैव देहानें ।**
**छेदी विस्तृतमूली[6]   तरुला ह्या दृढ असंगशस्त्रानें[7] ॥ ३ ॥**

ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तंति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

**शोधावें पद मग तें   जेथें जातांच जन्मकर्म सरें ।**
**आद्य पुरुष तोच भजे   प्रकृति जया पासुनी जुनी पसरे ॥ ४॥**

निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥

**अध्यात्मीं रत, संग   श्लाघा[8] मोहादि टाकुनी प्रज्ञ ।**
**सुखदुःखद्वंद्व न ज्यां   अव्यय पद पावतात तें सुज्ञ[9] ॥ ५ ॥**

न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

---

१ शेंडा. २ त्रिगुणांनीं पोसलेले. ३ विषयरूप पानें. ४ डाहळ्या. ५ आरंभ व शेवट. ६ वाढलेलीं किंवा खोल गेलेलीं आहेत मुळें ज्याचीं. ७ अनासक्ति. ८ अहंपणा. ९ बुद्धिमंत.

तें पद दावायाला रविशशिचें कीं न अग्निचें काम ।
फिरति न गेल्या जेथुनि तें माझें परम अर्जुना ! धाम ॥ ६ ॥

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनःषष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥

माझा अंश सनातन होउनि भूतें जगीं यथाकाळीं ।
इंद्रियषट्क मनादि प्रकृतींतिल सर्वही सदा चाळी ॥ ७ ॥

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गंधानिवाशयात् ॥ ८ ॥

घेतो शरीर ह्यांसह ईश्वर कीं सोडितो जइं त्यास ।
घेउनि जातो ह्यांना वायु जसा आपुल्या सवें वास ॥ ८ ॥

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

जिव्हा नासिक हीं कीं त्वक्चक्षुर्घ्राण इंद्रियें पांच ।
मनही अधिष्ठुनी हें साऱ्या विषयांस सेवितो हाच ॥ ९ ॥

उत्क्रामंतं स्थितं वापि भुंजानं वा गुणान्वितम् ।
विमूढा नानुपश्यंति पश्यंति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥

असतो वसतो कैसा कैसा भोगी गुणांस हें गूढ ।
ज्ञानाक्ष पाहतो तो ह्यातें कधिंही न पाहती मूढ ॥ १० ॥

यतंतो योगिनश्चैनं पश्यंत्यात्मन्यवस्थितम् ।
यतंतोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यंत्यचेतसः ॥ ११ ॥

योगी यत्नी ह्याला पाहुनियां नित्य अंतरीं रमती ।
ह्याला न पाहती ते यत्नानेंही अशुद्ध मंदमती ॥ ११ ॥

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चंद्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥

रविपासुनी निघोनी दावी जें तेज सर्व विश्वास ।
किंवा चंद्राग्नींतिल तेंही माझेंच, ठेव विश्वास ॥ १२ ॥

---

१ त्वचा, डोळे व नाक. २ मनामध्येंही शिरून. ३ डोळसज्ञानी, आत्मज्ञानी.

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।
पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥

**पृथ्वींत मीच शिरुनी सामर्थ्यें भूतभार हा सोशीं ।**
**रसयुक्त चंद्र होउनि ह्या सार्‍या मीच औषधी पोशीं ॥ १३ ॥**

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥

**प्राण्यांच्या देहीं या होउनि जठराग्नि मीच आहारीं ।**
**प्राणापानेंकरुनी अन्नें पचवून टाकितों चारी ॥ १४ ॥**

सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

**ज्ञान स्मृति विस्मृति मी होउनि हृदयस्थ देत सर्वांस ।**
**श्रुतिगम्य वेदवेत्ता कर्ता वेदांत वेद मी व्यास ॥ १५ ॥**

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥

**दोन पुरुष असती कीं क्षर अक्षर ह्मणुनि जाण ह्या लोकीं ।**
**भूतें सारीं क्षर तो अक्षर कूटस्थ तोच अवलोकीं ॥ १६ ॥**

उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥

**उत्तम पुरुष निराळा परमात्मा त्यास सर्वही वदती ।**
**त्रिभुवनिं भरूनि अव्यय ईशत्वें जो धरीतसे जगती ॥ १७ ॥**

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

**बहु भिन्न मी क्षराहुनि उत्तम मी अक्षराहुनी समज ।**
**ह्यास्तव लोकीं वेदीं पुरुषोत्तम हें प्रसिद्ध नांव मज ॥ १८ ॥**

---

१ अन्नांचे चार प्रकारः—१ खाद्य किंवा भक्ष्य—चावून खाण्यासारखें. २ पेय—दूध इ० पिण्यासारखें. ३ लेह्य—मध इ० चाटून खाण्यासारखें. ४ चोष्य—ऊंस इ० चोखून खाण्यासारखें. २ मध्यस्थ मेरूसारखा.

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

**पुरुषोत्तम मीच असें समजे सर्वज्ञ जो सदा मज तो ।**
**पार्था ! परोपरीनें भक्ति धरोनी मलाच कीं भजतो ॥ १९ ॥**

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

**बहु गुंह्य शास्त्र ह्यापरि तुज मीं कथिलें तरीहि निष्पापा ! ।**
**तो बुद्धिमंत जो हें जाणुनि कृतकृत्य होतसे बापा ! ॥ २० ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासू० पुरुषोत्तमयोगो नाम
पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

**पंधरावा अध्याय समाप्त.**

---

१ अत्यंत गूढ किंवा गहन.

# अध्याय १६ वा.

श्रीभगवानुवाच ।

अभयं सत्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥

श्रीभगवान्–

स्वाध्याय[1] दान शम[2] दम[3] आर्जव तप यज्ञ चित्तसंशुद्धी[4] ।
निर्भयता ज्ञानात्मक धरणें योगामधें सदा बुद्धी ॥ १ ॥

अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शांतिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥

मार्दव शांति अहिंसा अक्रोध त्याग लाज कीं सत्य ।
भूतदया निस्पृहता सौजन्य स्थैर्य पाळणें नित्य ॥ २ ॥

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवंति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

द्रोह श्लाघा नसणें निर्मलता तेज धैर्य हीं वसतीं ।
तैशी क्षमा हि पार्था ! दैवीसंपत्तिच्या नरा असती ॥ ३ ॥

दंभो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥

अज्ञान दंभ चित्तीं क्रोध क्रूरत्व गर्व अभिमान ।
असतीं जयास पार्था ! त्याची संपत्ति आसुरी मान ॥ ४ ॥

दैवी संपद्विमोक्षाय निबंधायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पांडव ॥ ५ ॥

दैवी संपत्ति सदा मुक्त करी आसुरी करी बद्ध ।
शोक नको पार्था ! कीं दैवी संपत्तिवंत तूं शुद्ध ॥ ५ ॥

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

---

१ वेदाध्ययन. २ शांति. ३ मनोनिग्रह. ४ चित्ताची उत्तमशुद्धि. ५ आत्मप्रौढी.

भूतो[1]त्पत्ति जगीं ह्या द्विविध[2] असे दैव आणि आसुर ती ।
दैवी विस्तृत कथिली कथितों ही ऐक आसुरी पुरती ॥ ६ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥

नकळे प्र[3]वृत्ति असुरां किंवा नसते निवृ[4]त्ति ही ठावी ।
[5]शौचाचारहि नेणति सत्य नसे ज्यांचिया कधीं गांवीं ॥ ७ ॥

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

मिथ्या कृत्रिम जग हें ईश्वर नाहींच बोलती मान्य ।
संभोगें विश्व घडे कामाविण हेतु[6] कोणता अन्य ? ॥ ८ ॥

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।
प्रभवंत्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

ऐशीच दृष्टि त्यांची नष्टात्मे अल्पबुद्धि जे बारे ! ।
शत्रूच उग्रकर्मे जन्मति विश्वक्षयार्थ ते सारे ॥ ९ ॥

काममाश्रित्य दुष्पूरं दंभमानमदान्विताः ।
मोहाद्गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्ततेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

[7]श्लाघा दंभें करुनी मत्त मदें कामसागरीं बुडती ।
अशुभ व्रतीं धरोनी मोहें दुर्बुद्धि सर्वदा पडती ॥ १० ॥

चिंतामपरिमेयां च प्रलयांतामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

विषयोपभोग सारे हेच जयां वाटती जगीं थोर ।
ते सर्वकाल चिंता [8]मरणापर्यंत वाहती घोर ॥ ११ ॥

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
ईहंते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

शतपाशबद्ध आशा कामक्रोधास शोभती दास ।
विषयार्थं अन्यायें द्रव्याची आणिती घरीं रास ॥ १२ ॥

---

१ प्राण्यांची उत्पत्ति. २ दोन प्रकारची. ३ व्यवहार. ४ परमार्थ. ५ निर्मल आचार. ६ निर्माणकर्ता. ७ आत्मस्तुति. ८ मृत्यु आदिकरून.

इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यती पुनर्धनम् ॥ १३ ॥

मिळवी मी हें आजी हीही इच्छा करीन मी पुरती ।
इतकें धन हें आहे घालिन त्याच्यामध्यें पुन्हा भरती ॥ १३ ॥

असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

हा शत्रु मारिला मी बाकीचेही करीन मी विद्ध ।
भोक्ता समर्थ तो मी मीच सुखी मी बलाढ्य मी सिद्ध ॥ १४ ॥

आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥

श्रीमंत थोर तो मी मत्सदृश कोण! बोलती अज्ञ ।
सुखही यथेच्छ भोगूं मोहें ह्मणती करूनियां यज्ञ ॥ १५ ॥

अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतंति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

वेष्टूनि मोहजाळीं भ्रांती उठती अनेक चित्तांत ।
आसक्त कामभोगीं होउनि पडती सदैव नरकांत ॥ १६ ॥

आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजंते नाम यज्ञैस्ते दंभेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

धनमानमदें फुगती तनु पोसुनि गर्वही चढे ज्यांस ।
करितात यज्ञ ते ही दंभानें अविधियुक्त नांवास ॥ १७ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

कामक्रोधअहंकृति बलदर्पाचा धरूनियां वेष ।
निजपरदेहीं माझी करिती निंदा धरूनियां द्वेष ॥ १८ ॥

तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥

---

१ मिळविलें. २ पूर्ण. ३ माझ्यासारखा. ४ लुब्ध. ५ बळाचें आणि गर्वाचें. ६ स्वरूप.

ऐसे क्रूर द्वेष्टे निंदक नर त्या समस्त अधमांस।
घाली मी दुष्ट अशा आसुरि योनींत[1] नित्य जन्मास ॥ १९ ॥

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि।
मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥

जन्मोजन्मीं कुचमुनि आसुरि योनींत मूढ बापारे!।
जाती अधोगतीला मग मातें पावतां न ते सारे ॥ २० ॥

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥

आहेत तीन बा! हीं नरकांचीं आत्मघातकी[2] दारें।
काम क्रोध तसा हा लोभ ह्मणुनि तिनिहि सोडणें बारे! २१

एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

नरकद्वारापासुनि पार्था! ह्या त्रिविध[3] जो सुटे नर तो।
कल्याण करुनि अपुलें पुढति सुखें सद्गतीसही वर्तो[4] ॥ २२ ॥

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

सोडिति शास्त्रविधी जे मानुनि सर्वस्व काय तो कामें[5]।
सिद्धि न पावे त्यांना कधि नाहीं सद्गती न आराम[6] ॥ २३ ॥

तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

कार्याकार्य विचारीं ह्मणुनी शास्त्र प्रमाण हें मात्र।
जाणुनि शास्त्रविधीतें नीट करायास कर्म हो पात्र[7] ॥ २४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासू० दैवासुरसंपद्विभागयोगो नाम
षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

सोळावा अध्याय समाप्त.

---

१ जातीमध्यें. २ आत्मनाशक. ३ तीन प्रकारच्या. ४ स्वीकारतो. ५ इच्छा. ६ सुख. ७ योग्य.

# अध्याय १७ वा.

अर्जुन उवाच ।

ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजंते श्रद्धयान्विताः ।
तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥

अर्जुन—

सोडुनि शास्त्रविधीतें यजिती[1] श्रद्धा धरूनि जे भक्त ।
त्यांची श्रद्धा कैशी? सत्वें किंवा रजें तमें युक्त? ॥ १ ॥

श्रीभगवानुवाच ।

त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा ।
सात्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥

श्रीभगवान्—

त्रिविधें[2] श्रद्धा होती संस्कारें ह्या जिवांसही[3] पाही ।
सात्विक राजस तामस एक तुला सांगतों सख्या! त्यांही[4] ॥ २ ॥

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

सत्वानुरूप[5] होते श्रद्धा हा अर्जुना! असे नियम ।
श्रद्धामय पुरुषचि हा श्रद्धा जैशी तिच्यासि तोहि सम[6] ॥ ३ ॥

यजंते सात्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः ॥ ४ ॥

सात्विक देवां यजती राजसजन यक्षराक्षसां यजती[7] ।
बाकी उरले तामस भूतप्रेतादिकांस ते भजती ॥ ४ ॥

अशास्त्रविहितं घोरं तप्यंते ये तपो जनाः ।
दंभाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥

शास्त्रीं न बोलिलें तें करिती जे का उगाच तप घोर[8] ।
दंभें अहंकृतीनें विषयेच्छेचा धरूनियां जोर ॥ ५ ॥

१ उपासना करतात. २ तीन प्रकारच्या. ३ प्राण्यांना. ४ त्यासुद्धां. ५ स्वभावाप्रमाणें. ६ एकरूप. ७ उपासना करतात. ८ उग्र.

कर्षयंतः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवांतःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥

क्षीण करिति भूतात्मक[1] देहा[2] अंतस्थ जो वसे प्राण ।
छळिती मूढ मला त्या तन्निश्चय राक्षसी असें जाण ॥ ६ ॥

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥

सर्वांना आहारहि तीन तऱ्हेचे सदैव आवडती ।
ऐके दानमखाचे भेद तपाचेहि तीन जे घडती ॥ ७ ॥

आयुःसत्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्विकप्रियाः ॥ ८ ॥

आयुष्यबलसुखातें वाढवितो करुनि रोगसंहार ।
मृदु मधु रसाळ ऐसा होतो प्रिय सात्विकांस आहार[3] ॥ ८ ॥

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

दाहक अत्युष्ण कटु क्षार तिखट रूक्ष भक्षितां कष्ट ।
दे रोगशोकदुःखा होतो आहार राजसां इष्ट ॥ ९ ॥

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥

यद्दुकाळ लोटलेलें सुकलें विटलें सुटूनियां घाण ।
उच्छिष्ट कीं अमंगल प्रिय भोजन तामसां असें जाण ॥ १० ॥

अफलाकांक्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्विकः ॥ ११ ॥

सोडुनि सर्व फलेच्छा समजुनि कर्तव्य नीट विधियुक्त[4] ।
करणें प्रसन्नचित्तें सात्विक तो यज्ञ होतसे उक्त[5] ॥ ११ ॥

अभिसंधाय तु फलं दंभार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

---

१ पंचभूतात्मक. २ देहाला. ३ अन्न, भक्ष्य. ४ विधिपूर्वक. ५ यथावत्.

दृष्टी[1] धरुनि फलावरि केवळ दंभार्थ मांडला[2] असतो।
पार्था! करणें ऐसा यज्ञ जगामाजि जाण राजस तो ॥ १२ ॥

विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

नच अन्न दक्षिणाही विधिहि नसे ज्यांत मंत्रही नसतो।
श्रद्धा विरहित ऐसा करणें ह्मणतात यज्ञ तामस तो ॥ १३ ॥

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

देवप्राज्ञ[3]द्विजगुरु—पूजन कीं ब्रह्मचर्य अवलोकीं।
आर्जव शौच अहिंसा शारिरतप बोलतात हें लोकीं ॥ १४ ॥

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

[4]लागे न वाक्य ऐसें वाणी बहु गोड जी हि[5]तप्रद ती।
स्वा[6]ध्यायाभ्यास सदा वाङ्मयतप ह्यास सर्वदा व[7]दती॥ १५ ॥

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

चित्त प्रसन्न मार्द[8]व मननिग्रह आणि भावसंशु[9]द्धी।
मौनहि तसेंच जें तें मानस तप बोलतात सद्बु[10]द्धी! ॥ १६ ॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।
अफलाकांक्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

निस्सीम श्रद्धेनें त्रिविध असें तप करील नर जो कीं।
सोडुनि सकल फलेच्छा सात्विक तप बोलतात तें लोकीं ॥१७॥

सत्कारमानपूजार्थं तपो दंभेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

---

१ दिखाऊ. २ आरंभलेला. ३ देव, विद्वान्, ब्राह्मण, वडील ह्यांची पूजा. ४ दुसऱ्याचें मन दुखणार नाहीं असें. ५ कल्याणकारक. ६ वेदाध्ययनाचा परिपाठ. ७ बोलतात. ८ नम्रता. ९ शुद्धबुद्धि. १० हे बुद्धिमंता अर्जुना!

सत्कार मान पूजा ह्यास्तव[1] करणें तपस्समारंभें ।
ह्मणती चंचल अध्रुव[2] राजस तप तें जयामधें दंभें[3] ॥ १८ ॥

मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥

हट्टें मूर्खत्वें कीं इच्छुनि करणें मनांत परघातें[4] ।
अथवा छळूनि आत्मा तामस तप तें समस्त ह्मणतात ॥ १९ ॥

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।
देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतं ॥ २० ॥

देणें विहित ह्मणूनीं न धरी उपकारही मनीं त्याचें ।
देशीं कालीं पात्रीं सात्विक तें दान बोलती साचें ॥ २० ॥

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥

प्रत्युपकारार्थचि दे देतांना दुःखही मनीं वसतें ।
इच्छूनी फल चित्तीं देणें जें ह्मणति दान राजस तें ॥ २१ ॥

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामससुदाहृतम् ॥ २२ ॥

देशस्थळपात्र नसे उचित[5] न देतां जयांत सत्कारें[6] ।
तामस तें दान ह्मणति देणें जें का करूनि धिःकार ॥ २२ ॥

ओं तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

ओंतत्सत्त्रिपदानें ब्रह्माचें नांवहीं असें त्रिविधें ।
तेणें पूर्वी केलें विप्रांनीं वेदयज्ञही विविधें ॥ २३ ॥

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।
प्रवर्तंते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥

ह्मणुनीच वेदवेत्ते यज्ञतपोदान ज्या क्रिया उक्त ।
ओंकारोच्चारानें आरंभिति सर्वही विधानोक्त[12] ॥ २४ ॥

---

१ तपाचा खटाटोप. २ अशाश्वत. ३ ढोंग. ४ दुसऱ्याचा नाश. ५ योग्य, उचित. ६ समजत नाहीं. ७ सन्मान. ८ तिरस्कार. ९ ओं—तत्—आणि सत्—ह्या तीन शब्दें-करून. १० तीन प्रकारचें. ११ अनेक. १२ वेदोक्त.

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियंते मोक्षकांक्षिभिः ॥ २५ ॥

**तच्छब्दोच्चारानें[1] लेश फलेच्छा मनीं न लक्षूनी[2] ।**
**दानादि यज्ञ तप हीं केलीं कर्मैं किती मुमुक्षूंनीं[3] ॥ २५ ॥**

सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥

**सच्छब्द[4] योजिती कीं सद्भावीं[5] साधुभाव या अर्थी ।**
**सत्कर्मासहि लोकीं तैसा सच्छब्द लाविती पार्था ! ॥ २६ ॥**

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

**सच्छब्द लाविती त्या दानीं यज्ञीं तपांत जो धर्म ।**
**सच्छब्दें ब्रह्म कळे कर्मासहि बोलतात सत्कर्म ॥ २७ ॥**

अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

**अश्रद्धेनें करणें तप किंवा होम दान जें लोकीं ।**
**बोलति असत्त्याला[6] इहलोकीं तें फळें न परलोकीं[7] ॥ २८ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीता० श्रद्धात्रयविभागयोगो नाम

सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

**सतरावा अध्याय समाप्त.**

---

१ 'तत्' शब्दाच्या उच्चारानें. २ ठेवून. ३ मोक्षाची इच्छा करणारांनीं. ४ 'सत्' शब्द. ५ सद्विकाराला. ६ 'असत्' तयाला. ७ ह्या जगामध्यें किंवा परलोकांत सुद्धां.

# अध्याय १८ वा.

**अर्जुन उवाच।**

संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम्।
त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥

**अर्जुन–**

**इच्छीं तत्त्व कळाया संन्यासाचें पहा महाबाहो[1] !।**
**त्यागाचेंही देवा! तत्त्व विशद[2] करुनि आज सांगा हो! ॥ १ ॥**

**श्रीभगवानुवाच।**

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः।
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

**श्रीभगवान्–**

**कर्मे सकाम[3] त्यांचा त्यागचि संन्यास जाणती सुज्ञ।**
**सर्वहि कर्मफलाच्या त्यागाला त्याग बोलती प्रज्ञ[4] ॥ २ ॥**

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः।
यज्ञदानतपः कर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

**सारीं सदोष कर्में टाकावीं बोलती किती प्रज्ञ।**
**कोणी ह्मणती न कदा त्यागावें कर्म दान तप यज्ञ ॥ ३ ॥**

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम।
त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥

**त्यागाविषयीं माझा निश्चयही घालितों तुझ्या कानीं।**
**त्यागांतहि केले कीं त्रिविध[5] असे भेद सुज्ञ लोकांनीं ॥ ४ ॥**

यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत्।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥

**कर्मे सुखें करावीं सोडुंनये यज्ञ कीं तपोदाना।**
**कीं यज्ञ दान तप हीं पावन[6] करितात बुद्धिमंतांना ॥ ५ ॥**

---

१ हे श्रीकृष्णा!. २ स्पष्ट. ३ फलेच्छा धरलेलीं. ४ बुद्धिमंत. ५ तीन प्रकारचे. ६ पुनीत.

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥

**परि कर्में करणें तीं सोडुनि फल कीं समस्त ही काम ।**
**करणें अवश्य उत्तम माझें मत हें सख्या! असें ठाम ॥ ६ ॥**

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

**न्यास नियत कर्मांचा कोणाला कधिंच होतही नसतो ।**
**मोहानें केला तरि लोकीं ह्मणतात त्याग तामस तो ॥ ७ ॥**

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

**देहास कष्ट होतिल याचि भयानें स्वकर्म जो टाकी ।**
**त्याग घडे राजस तो त्यागाचें फळ तया मिळेना कीं ॥ ८ ॥**

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
संगं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

**करणें विहित ह्मणोनी करितो जो नियत कर्म अवलोकीं ।**
**सोडुनि संग फलातें सात्विक तो त्याग बोलती लोकीं ॥ ९ ॥**

न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।
त्यागी सत्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

**द्वेष नसे कटु कर्मी पटु कर्मी आवडी नसे हेंही ।**
**सत्त्वस्थ त्यागी तो बुद्धीनें श्रेष्ठ तो असंदेही ॥ १० ॥**

नहि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

**निश्शेष देहधारी टाकायाला न कर्मही शक्त ।**
**वास्तव तोच त्यागी कर्मफला टाकुनी सदा मुक्त ॥ ११ ॥**

१ फलेच्छा. २ निश्चित. ३ नेहेमींच्या. ४ योग्य, उचित. ५ आसक्ति. ६ नावडत्या. ७ आवडत्या. ८ निःसंशयी. ९ निखालस. १० प्राणी. ११ समर्थ.

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥

**वाईट मिश्र बरवीं कर्माचीं तीन हीं फळें मिळती ।**
**अत्यागीं[1] यास सदा संन्याशाला कधीं न तीं फळती ॥ १२ ॥**

पंचैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
सांख्ये कृतांते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणां ॥ १३ ॥

**सिद्धीस[2] कोणत्याही कर्माच्या कारणें[3] अशीं पांच ।**
**वेदांतीं[4] सांख्यीं[5] ही बोलति तीं सांगतों तुला साच[6] ॥ १३ ॥**

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥ १४ ॥

**आधीं शरीर, कर्ता, नानापरि भिन्न भिन्न हीं करणें[7] ।**
**व्यापार वेगळाले, दैवहि त्याच्यांत पांचवें धरणें ॥ १४ ॥**

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पंचैते तस्य हेतवः ॥ १५ ॥

**आरंभी नर कार्या कायावाचामनें जरी साच ।**
**अन्यायें न्यायें वा त्याला असतात हेतु[8] हे पांच ॥ १५ ॥**

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥

**ऐसें असून कर्ता आत्मा केवळ गमेल यन्मतिते[9] ।**
**शास्त्रांधदृष्टि[10] त्यांची बघति विचारें कधीं न दुर्मति ते ॥ १६ ॥**

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वापि स इमाँल्लोकान्न हंति न निबध्यते ॥ १७ ॥

**नाहीं मीपण ज्याला बुद्धि नसे लिप्त जी सदा शुद्ध ।**
**लोकांस मारुनी ह्या नच मारी तो नव्हे कधीं बद्ध ॥ १७ ॥**

---

१ त्याग करीत नाहीं त्याला. २ पूर्णतेला. ३ साधनें. ४ वेदांतींतील. ५ तत्त्वज्ञानांतील. ६ खरीं. ७ इंद्रियें. ८ कारणें. ९ ज्यांच्या बुद्धीला. १० शास्त्रामध्यें ज्यांचे नेत्र अंध.

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।
करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

**ज्ञान ज्ञेय ज्ञाता कर्माचा विधि असा त्रिविध आहे ।**
**कर्ता कर्म करण[1] हा कर्माचा संग्रह त्रिविध[2] पाहे ॥ १८ ॥**

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।
प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

**हे ज्ञान कर्म कर्ता भेद गुणांचे जगीं त्रिविध ऐसे ।**
**सांख्यीं[3] सांगितले ते ऐकें, कथितों यथार्थ[4] मी तैसे ॥ १९ ॥**

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्विकं ॥ २० ॥

**सर्वहि विभक्त[5] भूतीं अव्यय[6] अविभक्त एक जो भाव[7] ।**
**दिसतो ज्ञानानें ज्या सात्विक हें ज्ञान त्याजला नांव ॥ २० ॥**

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।
वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥

**कीं भिन्न ज्ञानानें पाहे जें सकल भिन्न भावानें ।**
**सर्वा भूतां, राजस तें ज्ञान असे प्रसिद्ध नांवानें ॥ २१ ॥**

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।
अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

**एकच देहीं मानी आत्मा हा सकल जें अहेतुक[8] तें ।**
**क्षुद्र ह्मणति तामस तें तत्त्वार्थाला सदैव जें मुकतें ॥ २२ ॥**

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥

**प्रीतिद्वेषविवर्जित किंवा सोडोनि लोभ अवलोकीं ।**
**अफलेच्छेनें करणें सात्विक तें कर्म बोलती लोकीं ॥ २३ ॥**

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

---

१ साधनें. २ तीन प्रकारचे. ३ सांख्य तत्त्वज्ञानामध्यें. ४ जशाचे तसे. ५ भिन्न-भिन्न. ६ अखंड. ७ धर्म. ८ निष्कारण. ९ अंतरतें.

कामेच्छेनें करणें  किंवा करणें महा अहंकारें ।
करतां कष्टी होणें  राजस तें कर्म बोलती सारें ॥ २४ ॥

अनुबंधं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।
मोहादारभ्यते कर्म तत्तामसमुदाहृतम् ॥ २५ ॥

सामर्थ्यही न पाहे  क्षय[1] किंवा पाहतां न परहिंसा[2] ।
मोहानें आरंभी  तामस तें कर्म जाण नरपुंसा[3] ! ॥ २५ ॥

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥

निः[4]संग नच फलेच्छा  धृत्यु[5]त्साहें करून जो [6]युक्त ।
सिद्धिअसिद्धींतहि सम  कर्ता सात्विक जगांत तो उक्त ॥२६॥

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥

इच्छा कर्मफलाची  लोभी हिंसक नव्हे कधीं शुद्ध ।
हर्षें शोकें मंडित  राजस कर्ता असेच तो सिद्ध ॥ २७ ॥

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

कपटी अयुक्त शठ जो  सुस्त महा मूढ आणि गर्विष्ठ ।
रडका चेंगट ह्मणती  तामस कर्ता जगामधें स्पष्ट ॥ २८ ॥

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।
प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेण धनंजय ॥ २९ ॥

धृतिचे मतिचे असती  गुण भेद त्रिविधही तसे बारे! ।
निश्शेष सांगतों तुज  आज तुला तेहि वेगळे सारे ॥ २९ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
बंधं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥

ग्राह्याग्राह्य भयाभय  कार्याकार्यांत जी धरी शुद्धी ।
जाणे बंध विमोक्षा  पार्था! ती जाण सात्विकी बुद्धी ॥ ३० ॥

---

१ तोटा. २ दुसऱ्याचें नुकसान. ३ हे पुरुषश्रेष्ठा अर्जुना! ४ आसक्ति सोडून. ५ धैर्यानें आणि उत्साहानें. ६ मंडित. ७ ह्मणतात. ८ घातकी.

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।
अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥

**धर्माधर्मी किंवा कार्याकार्यांत नीट सत्यार्था[1] ।**
**दावी कधीं न जी कां जाणे ती बुद्धि राजसी पार्था! ॥ ३१ ॥**

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसा वृता ।
सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥

**धर्मा अधर्म मानुनि विपरीतार्थांत[2] जी करी वसती ।**
**पाहे सदैव उलटें पार्था ! जी बुद्धि जाण तामस ती ॥ ३२ ॥**

धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥

**प्राणेंद्रियक्रिया ज्या धृतिनें एकत्र ह्या धरूं शकती ।**
**योगानें एकाग्रहि साधी धृतिबोलतात सात्विक ती ॥ ३३ ॥**

यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।
प्रसंगेन फलाकांक्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥

**धर्मार्थकाम ह्यांतें जी धृति पार्था ! सदैव संरक्षी ।**
**इच्छी फल प्रसंगें राजस ती सर्वथैव धृति लक्षी ॥ ३४ ॥**

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।
न विमुंचति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥

**सोडीना दुर्मति जी निद्रा मद कीं विषाद[3] भय शोक ।**
**ऐशी असेल पार्था! तामस धृति बोलती तिला लोक ॥ ३५ ॥**

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखांतं च निगच्छति ॥ ३६ ॥

**सुखही त्रिविध[4] असे बा! कथितों तूं श्रवणही तरी कर तें ।**
**अभ्यासानें ज्याच्या मन रमुनी दुःख सर्व संहरतें[5] ॥ ३६ ॥**

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥

---

१ वास्तव्य. २ विरुद्ध. ३ द्वेष. ४ तीन प्रकारचें. ५ नाश पावतें.

आधीं विषसमं[1] वाटे मागुनि ये अनुभवा सुधासम[2] जें ।
बुद्धीमनःप्रसादें[3] सात्विक सुख होय तें असें समजे ॥ ३७ ॥

विषयेंद्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

विषयेंद्रियसंयोगें[4] आधीं वाटे मना सुधासम जें ।
परिणामीं[5] विषसम जें राजस सुख तें मनामधें समजे ॥ ३८ ॥

यदग्रे चानुबंधे च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

आदीपासुनि अंतीं बुद्धीला मोह घालुनी वसतें ।
उठवी, प्रमाद[6] आळस निद्रा, सुख जें जनांत तामस तें ॥ ३९ ॥

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

इहपरलोकीं देवीं[7] प्राणी कोणीच कीं नसे कुठला ।
मायेच्या ह्या ऐशा तीन गुणांतूनि जो असे सुटला[8] ॥ ४० ॥

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥

वसति ब्राह्मण लोकीं क्षत्रिय कीं वैश्य शूद्र जे धर्में ।
असती पहा तयांचीं स्वाभाविक वेगवेगळीं कर्में ॥ ४१ ॥

शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥

आस्तिक्य[9] शौच[10] आर्जव[11] शम दम किंवा क्षमाहि तप साचें ।
विज्ञान[12] ज्ञान असें स्वाभाविक कर्म जाण विप्रांचें ॥ ४२ ॥

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥

---

१ विषासारखें. २ अमृतासारखें. ३ बुद्धीच्या आणि मनाच्या प्रसादानें होतें. ४ विषयांच्या आणि इंद्रियांच्या सांगडीमुळें. ५ शेवटीं. ६ अपराध, चुक्या. ७ देवांमध्यें सुद्धां. ८ पार पडलेला. ९ परमेश्वरनिष्ठा. १० निर्मलता. ११ सरलता. १२ व्यवहारज्ञान.

**धृति[1] शौर्य दान तेज[2]हि करणें नच पाठ दावितां युद्ध ।**
**दाक्षिण्य[3] ईशभक्ती हें क्षत्रियकर्म बा ! स्वयंसिद्ध[4] ॥ ४३ ॥**

कृषिगोरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

**गोरक्षण[5] वाणिज्य[6] स्वाभाविक वैश्यकर्म आणि कृषी[7] ।**
**परिचर्या[8] शूद्रांचें स्वाभाविक कर्म बोलतात ऋषी ॥ ४४ ॥**

## श्रीभगवानुवाच ।

स्वे स्वे कर्तण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।
स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु ॥ ४५ ॥

## श्रीभगवान्—

**अपुलाल्या कर्मीं रत[9] होतां पुरुषास सिद्धि[10]ही पावे ।**
**अपुल्या कर्मीं येते सिद्धि कशी तेंहि ऐकुनी घ्यावें ॥ ४५ ॥**

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः ॥ ४६ ॥

**भूतप्रवृत्ति[11] जेथुनि जेणें केलें समस्त[10] हें[12] व्याप्त ।**
**निजकर्में[13] पूजुनि त्या मनुजाला सिद्धि होतसे प्राप्त ॥ ४६ ॥**

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥

**विगुण[14] स्वधर्म[15] हितकर[15] आचरणाहुनि बरा[16]हि परधर्म ।**
**पातक नव्हेच करितां स्वाभाविक[17] जें असेल निजकर्म ॥ ४७ ॥**

सहजं कर्म कौंतेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारंभा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

---

१ धैर्य. २ पाणीदारपणा. ३ दक्षता. ४ मूळचेंच. ५ गुरें राखणें. ६ व्यापार. ७ शेतकी. ८ सेवा, नोकरी. ९ मग्न. १० पूर्णता. ११ प्राण्यांची उत्पत्ति. १२ हें सर्व ब्रह्मांड. १३ आपल्या कर्मानें. १४ कमी प्रतीचा. १५ आपला धर्मच, कल्याण दायक. १६ उत्तम परधर्म आचरणाहूनही. १७ सहजीं आलेलें.

स्वाभाविक कर्म जरी दोषास्पदही[1] तरी न टाकावें ।
सर्वंच कर्मैं दूषित[2] धूम्रें अग्नीस जेविं झांकावें ॥ ४८ ॥

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

निःस्पृह[3] आणि जितात्मा[4] ज्याची कोठें नसेच सक्तमती[5] ।
संन्यासें तोच जगीं पावे नैष्कर्म्यसिद्धि[6] उत्तम ती ॥ ४९ ॥

सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।
समासेनैव कौंतेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥

मिळतां सिद्धि कसें तें ब्रह्म मिळे अर्जुना! अविक्षेप ।
ज्ञानाची निष्ठा ती उत्तम कथितों करूनि संक्षेप ॥ ५० ॥

बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्यच
शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥

धैर्यें मन आवरुनी होवोनी शुद्ध बुद्धिनें युक्त ।
शब्दादि विषय टाकुनि रागद्वेषांतुनी सदा मुक्त ॥ ५१ ॥

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।
ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥

एकांत मिताहारी[8] काया[9] वाचा[10] मनासही कवळी[11] ।
ध्यानीं योगीं तत्पर दृढतर वैराग्य सर्वदां जवळी ॥ ५२ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥

काम क्रोध परिग्रह[12] बल दर्प[13] न आढ्यताहि अणुमात्र ।
सोडुनि देउनि ममता शांत ब्रह्मास होतसे पात्र ॥ ५३ ॥

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥

---

१ दोषयुक्त. २ दोषयुक्त. ३ निरिच्छ. ४ मनोजयी. ५ बुद्धि आसक्त नाहीं. ६ निष्काम कर्मांची पूर्णता. ७ महती. ८ बेतानें खाणारा. ९ देह. १० वाणी. ११ आवरून धरता. १२ संग्रह. १३ गर्व.

**होतां ब्रह्म रमे मन सर्वांभूतीं सदैव होय सम ।**
**न करी इच्छा शोकहि त्याला मद्भक्ति लाभते परम[1] ॥ ५४ ॥**

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनंतरम् ॥ ५५ ॥

**मी जेवढा जसा त्या भक्तीनें जाणुनी मला तत्त्वें[2] ।**
**सत्यत्त्वें[3] कळल्या मी नंतर मिळतो मलाच ऐकत्वें[4] ॥ ५५ ॥**

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

**माझ्याच आश्रयानें कर्में सारीं सदैव जो करतो ।**
**पावे मम प्रसादें अव्यय[5] शाश्वत[6] पदासि गा! नर तो ॥ ५६ ॥**

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

**मत्पर[7] होउनि सारीं चित्तें[8] कर्में मलाच अर्पावीं ।**
**सेवोनि बुद्धियोगा[9] मद्रूपीं चित्त सर्वदां लावी ॥ ५७ ॥**

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनंक्ष्यसि ॥ ५८ ॥

**मन्निष्ठ[10] मत्प्रसादें होउनि तुटतिल विपत्तिचे[11] पाश ।**
**ऐसें असूनि गर्वें नायकशी तरि घडेल तव नाश ॥ ५८ ॥**

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

**भरुनि अहंकारानें रण[12] न करी ह्मणशि हा तुझा भास[13] ।**
**हें ह्मणणें व्यर्थ, तुला त्वत्प्रकृति[14] च करिल सिद्ध युद्धास ॥५९॥**

स्वभावजेन कौंतेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

---

१ श्रेष्ठ. २ तत्वदृष्टीनें. ३ सत्य प्रकारानें. ४ ऐक्यरूपानें. ५ अक्षय. ६ सनातन. ७ माझ्या ठिकाणीं तत्पर. ८ मनः पूर्वक. ९ कर्मयोगाला. १० माझ्या ठाईं निष्ठा. युक्त. ११ दुःखाचे. १२ युद्ध. १३ भ्रम. १४ तुझा स्वभावच.

स्वाभाविक कर्म तुझें त्यानें तूं अर्जुना! सदा बद्ध।
मोहें न करूं इच्छिसि परि करिशिल तूं अवश्य हें युद्ध ॥६०॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।
भ्रामयन्सर्व भूतानि यंत्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

सर्वां[१] भूतांच्याही ईश्वर हृदयांत तिष्ठतो[२] बा रे!।
मायाचक्रीं[३] घालुनि नाचवितो तोच जीव हे सारे ॥ ६१ ॥

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत।
तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥

त्यातेंचि शरण जाईं धरुनी सर्वस्व तो असा भाव।
लाभेल तत्प्रसादें शाश्वतसा[४] परम शांतिचा ठाव ॥ ६२ ॥

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

कथिलें ज्ञान तुला हें गुह्यांतिल गुह्य फार फार तरी।
ह्याचा विचार करुनी पूर्ण तुला जें गमेल तेंच करीं ॥ ६३ ॥

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

सर्वांत गुह्य उत्तम माझें तूं वचन हें पुन्हां परिस[५]।
कथितों तुझ्या हितास्तव कीं प्रिय तूं मज अति प्रियापरिस[६] ६४

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५ ॥

पूजीं वंदीं मजला होउनि मद्भक्त मन्मनीं राहीं।
मातेंचि पावशी मग „सत्य सख्या! करितसें प्रतिज्ञा ही ॥६५॥

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

टाकूनि धर्म सारे शरण रिघें एक तूं मला फक्त।
खेद नको, मीच करिन सर्वांहि पापांतुनी तुला मुक्त[७] ॥ ६६ ॥

---

१ प्राण्यांच्यासुद्धां. २ राहतो. ३ मायारूप रहाटावर. ४ अक्षय, असा. ५ श्रवण कर. ६ पेक्षां. ७ मोकळा.

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

**तपहीनां सांगु नको सांगु नको कधिंच तूं अभक्ताला ।**
**श्रवणेच्छाहीनाला किंवा जो दोष ठेवितो त्याला ॥ ६७ ॥**

य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

**हें परम गुह्य माझ्या भक्तांमाजीं कथील जो भावें ।**
**भक्ति श्रेष्ठ धरोनी निःसंशय तो मलाच कीं पावे ॥ ६८ ॥**

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

**प्रियकर त्याहुनि माझा नाहीं मनुजांत अन्य अवलोकीं ।**
**किंवा प्रियतम दुसरा त्याहुनि होणारही न भूलोकीं ॥ ६९ ॥**

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

**हा धर्मरूप तुमचा अमुचा संवाद जो पढे ज्ञानी ।**
**त्यानें ज्ञानमखानें पूजियलें मज असेंच मी मानीं ॥ ७० ॥**

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान् प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥

**धरुनि श्रद्धा नर जो ऐके निंदा करी न वीरा! हे ।**
**तो पुण्यश्लोकांच्या शुभलोकीं मुक्त होउनी राहे ॥ ७१ ॥**

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रनष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

**एकाग्र करुनि पार्था! आयकिलें काय हें तुवां सांग ।**
**अज्ञान मोह गेला किंवा नाहीं अझूनही सांग? ॥ ७२ ॥**

---

१ तपश्चर्या करित नाहीं त्याला. २ ज्याला ऐकावयाची इच्छा नाहीं त्याला. ३ मनुष्यांमध्यें. ४ पृथ्वीमध्यें. ५ धर्म सांगितला आहे असा. ६ संभाषण. ७ ज्ञानरूप यज्ञानें. ८ समजतों. ९ हे शूर वीरा अर्जुना! १० पुण्यवंतांच्या. ११ दिव्य लोकामध्यें. १२ संपूर्ण. १३ कथन कर.

### अर्जुन उवाच ।

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

### अर्जुन–

**गेला मोह स्मृति ही आली देवा ! भवंत्प्रसादानें ।**
**निःशंक जाहलों मी करितों रण, वचन हें तुझें माने ॥ ७३ ॥**

### संजय उवाच ।

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

### संजय–

**संवाद अर्जुनाचा श्रीहरिचा हा अपूर्व बहु वाटे ।**
**राजा ! ऐकुनि अंगीं येती अद्यापही पहा कांटे ॥ ७४ ॥**

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

**योगेश्वर कृष्णानें कथिला प्रत्यक्ष जो स्वयें योग ।**
**व्यासकृपें गुह्य बहु श्रवणाचा त्या मलाहि ये योग ॥ ७५ ॥**

राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

**श्रीकेशवार्जुनांचा अद्भुत संवाद पुण्यदायक हा ।**
**स्मरुनि स्मरुनी राजा ! वरि वरि होतो मनास हर्ष महा ॥ ७६**

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥

**श्रीहरिचें रूप मला अत्यद्भुत तें पुनः पुन्हां स्मरतें ।**
**आश्चर्यें राजा ! दे आनंदाचें पुनः पुन्हां भरतें ॥ ७७ ॥**

---

१ तुझ्या कृपेनें. २ मान्य आहे. ३ अद्भुत. ४ रोमांच. ५ योग्यांचा राजा. ६ सांगितला. ७ प्रसंग, संधि. ८ पुण्यप्रद. ९ आठवून आठवून. १० पुनःपुन्हां. ११ तें–११ व्या अध्याय तील–विश्वस्वरूप.

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

**योगेश्वर कृष्ण जिथें विंजय धनुर्धर खराखुरा जेथें ।**
**मज वाटे विजय श्री भाग्य महा, अढळ नीतिही तेथें ॥७८॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योग-
शास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे संन्यासयोगो
नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

**श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥**

**अठरावा अध्याय समाप्त.**

## सूचना.

पृष्ठ ४१ अध्याय ६ मध्यें 'अर्जुन उवाच' व पृष्ठ ११७ अ० १८ मध्यें 'श्रीभगवानुवाच' हीं नजरचुकीनें अधिक पडलीं आहेत. तसेंच पृष्ठ १०६ अ० १७ आर्या १० मध्यें 'यहुकाळ' पडलें आहे तेथें 'बहुकाळ' असें वाचावें. अध्याय ७ आर्या २९ हींत 'मोक्ष जरा' असें पडलें आहे. तेथें 'मृत्यु जरा' असें वाचावें. अध्याय १२ च्या आरंभीं 'अर्जुन उवाच' पडलें आहे. तेथें 'श्रीभगवान् उवाच' असें पाहिजे.

---

१ अर्जुन—पक्षीं—विजय—यश. २ लक्ष्मी.

## केरळकोकिळग्रंथप्रसारक मंडळी.

'केरळकोकिळ' चे एडिटर त्यांची लेखनशैली व कविताचातुर्य, आज वीस बावीस वर्षे सर्व महाराष्ट्र भाषाभिज्ञांस माहितच आहे. त्यांच्या लेखणींत विशेषेंकरून मोहकपणा, सरलता, शुद्धस्वरूप आणि सहज रीतीनें मनांत विषय बिंबवून देण्याची हातोटी, हे गुण प्रधानत्वेंकरून असतात. यास्तव आम्हीं त्यांनीं आजपर्यंत छापलेले सर्व ग्रंथ आमच्याकडे विक्रीस ठेवले आहेत. व—

**पुढील ग्रंथ अपुरे राहिलेले पुरे करून छापण्याचें काम सुरू आहे.**

१ श्रीवृन्मानसशास्त्र. २ चंद्रलोकची सफर. ३ केरळकोकिळच्या कविता.

महा. [illegible] कृत ग्रंथ 'विवेकसिंधु' सार्थ व सटीप छापत आहे.

### चरित्रमाला.

१ आद्यश्रीमच्छंकराचार्य. २ श्रीरामचरित्र. ३ ज्ञानेश्वराचें चरित्र इ० इ०.

### मासिकपुस्तकरूपानें छापत असलेले ग्रंथ.

१ वाल्मार्गी-ऐतिहासिक सचित्र कथामाला.

२ 'कोकिळगीता,-श्रीमद्भगवद्गीतेच्या प्रत्येक श्लोकांवर व्याख्यान.

### प्लेग व कॉलराप्रतिबंधक

### पट्टा.

रसायनिक रीत्या नाभीच्या द्वारें शरिरांत तन्मात्रेचा प्रवाह सुरू होऊन रक्तांतील श्वेत जीवांशांना रोगजंतू नाश करण्याचें सामर्थ्य देतो. ह्या अद्भुत शोधाची कल्पना अमेरिकेंतील मोठमोठ्या डाक्टरांच्या मतांवर व मुंबईंतील अनेक वर्षांच्या प्लेगच्या अनुभवाच्या पायावर रचलेली आहे. ह्मणून ह्यापुढें ह्या भयंकर रोगाच्या पायीं आपला जीव कोणीही धोक्यांत घालण्याचें कारण नाहीं. त्यांत औषधी शास्त्र, रसायनशास्त्र, तंत्रशास्त्र व सत्पुरुषांचा प्रसाद इतकीं एकत्र साधलीं असल्यामुळें हा तोडगा ह्मणजे ह्या मृत्युस्वरूप रोगावर केवळ अमृतवल्ली आहे.

**किंमत १ रुपया. ट. व्ही. पी. शिवाय.**

एक आण्याचीं तिकिटें पाठविलीं असतां सविस्तर माहिती.

**विष्णु कृष्ण आठल्ये,**

सबएडिटर 'केरळकोकिळ' व

**केरळकोकिळग्रंथप्रसारक मंडळीचे** चिटणीस.

**माधवाश्रम**-गिरगांव, **मुंबई.**